






१९३४

किंमत १। रुपया

दिनाकर
उर्फ
शं. का. गर्गे

कै. नाट्यछटाकार दिवाकर

ऊर्फ

शं. का. गर्गे यांच्या

# नाट्यछटा, गोष्टी, प्रहसनें

व

## 'कारकून' नाटक



किंमत १। रुपया.

## कै. दिवाकर (शंकर काशिनाथ गर्गे)

# नाट्यछटाकार.



(जन्म ता १-१-१८८९) (मृत्यु ता. १ आक्टोबर १९३१)

# नाट्यछटाकार

## यांचें अल्प चरित्र

### ( दत्तो वामन पोतदार )

नाट्यछटाकार म्हणून सर्व महाराष्ट्रात प्रसिद्धि पावलेले 'दिवाकर' यांचें संपूर्ण नाव शकर काशिनाथ गर्गे असें होते. दिवाकर हे यांचें पहिल्या घरचें आडनाव. हे गार्ग्य गोत्री यजुर्वेदी ब्राह्मण. याचा जन्म ता० १८ जानेवारी, सन १८८९ त पुणें येथें झाला. याचें मराठी शिक्षण आणि इग्रजी शिक्षणही पुणें येथील सुविख्यात नूतन मराठी विद्यालयात झालें. या विद्यालयातून इ. स. १९०७ मध्यें ते एस्. एफ्. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. घरच्या परिस्थितीमुळें त्यास शिक्षण पुढें चालविता आले नाहीं, आणि काहींतरी व्यवसाय बघणें प्राप्त होऊन ते नोकरी करू लागले पुढें त्यानीं काहीं वर्षे 'डिप्रेस्ड् क्लासेस् मिशन्' या संस्थेच्या शाळेत शिक्षक म्हणून काम केलें. काहीं दिवस ते त्या मिशनच्या सेंट्रल प्रायमरी स्कूलचे हेडमास्तरही होते. पुढें ता. ६ मार्च, १९१६ पासून त्यास नूतन मराठी विद्यालयात शिक्षकाची जागा मिळाली. तेव्हापासून अखेरपर्यंत ते याच विद्यालयात शिक्षक म्हणून काम करून प्रसिद्धीस आले. त्याजकडे इग्रजी १ ते ३ इयत्ताचे इंग्रजी शिकविण्याचेंच काम बहुतकरून देण्यात येत असे. पुढें ते एस्. टी. सी. हि झाले. खालच्या इयत्ताना नवीन पद्धतीने म्हणजे 'प्रत्यक्ष पद्धतीनें' इग्रजी शिकविणारे एक आदर्श शिक्षक असा लौकिक त्यानीं या कामीं संपादन केला.

त्याचा विवाह सन १९१० सालीं ता. २४ जून, शुक्रवारीं कोल्हापूर येथील रा. विष्णु नृसिंह पाठक याच्या कन्या सखूबाई ( पुढें राधाबाई ) याच्याशीं झाला (दि. रो.). यावेळीं त्यास अॅ. सुपरिन्टेन्डन्ट् ऑफ् पोलीसच्या ऑफिसात नोकरी मिळाली होती. ती ता० १ ऑगस्ट, १९१० पासून कायम झाली. तरी खातें बदलून घेण्याचा त्याचा प्रयत्न चालू होता. नोकरीच्या व्यतिरिक्त वेळ वाचनात, नाट्यप्रयोग पहाण्यात आणि रा. अण्णासाहेब

कारखाननीस, प्रो. वासुदेवराव पटवर्धनप्रभृति तज्ज्ञांच्या संगतींत आणि रा. बाळुभाऊ सहस्रबुद्धेवगैरे मित्रांच्या संगतींत जात असे. वाचनाविषयीं सन १९१० सालीं डिसेंबर ३१ ला त्यांच्या रोजनिशींत पुढील प्रमाणें शेरा आढळतो. ' यंदा वाचन चांगलेंच झालें. एकूण १७७५२ पृष्ठें वाचलीं. ' वाचलेल्या व अभ्यासलेल्या पुस्तकांच्या यादींत शेक्स्‌पिअरचीं नाटकें आणि स्कॉट्, मेरी कॉरेली, कॉनन्डाइल्, हेन्री वुड्, डिक्वेन्सी, तसेंच टेनिसन्, वुइलकॉक्स्, मोलियरवगैरे ग्रंथकारांचे इंग्रजी ग्रंथ आणि कित्येक मराठी चरित्रें, नाटकें व कादंबऱ्याही आहेत. रा. गडकरी यांच्याशीं दिवाकर यांची बैठक यावेळीं असे आणि ते आपलीं नाटकें दिवाकर यांस वाचूनहि दाखवीत असत. रा. एकबोटे ऊर्फ ' सहकारी कृष्ण ' हे यांच्याच कचेरींत नोकर होते त्यांच्या सांगण्यावरून टॉलस्टॉय्‌कडे दिवाकरांची दृष्टि वळली महाराष्ट्र नाटक मंडळीच्या बिऱ्हाडीं त्यांचे जाणेयेणें असल्यामुळें मंडळींतील बऱ्याच मंडळींशीं त्यांचा परिचय झालेला होता. पाहिलेल्या नाट्यप्रयोगावरून दिवाकरांच्या रोजनिशींत कोठें कोठें अभिप्रायार्थ शेरे लिहिलेले आढळतात. रा. टिपणीस यांचें ' कमला ' नाटक ' यथातथाच ' आहे. रा. वरेरकर यांचे ' कुंजविहारी ' ' बातांबेतांचेंच ' वाटलें ' असे शेरे मधूनमधून आढळतात. ' ७ एप्रिल १९११, रामनवमी रोजीं शेक्स्‌पिअर् संपूर्ण वाचून झाला. जीवाला अत्यंत समाधान वाटलें, व कृतज्ञतापूर्वक ईश्वरास शरण गेलों. ' या रा. दिवाकरांच्या लिहिण्यावरून त्यांच्या कोमल अंतःकरणाची आणि शेक्स्‌पिअर्‌प्रीतीची उत्तम साक्ष पटते.

याच वेळीं रा. दिवाकर यांनीं आपल्या लेखनास सुरवात केली २७ मार्च १९११ रोजीं 'यॉर्कशायर् ट्रॅजिडी'च्या आधारें ' रंगेल रंगराव ' या नांवाचें नाटक लिहिण्यास सुरवात झाली.

( ता. १ मे ) ' पंडित विद्याधर ' नांवाचें नाटक गटेच्या ' फॉस्ट् 'च्या आधारें लिहिण्यास सुरवात केली. हेतुः ' वाजली तर गाजराची पुंगी; नाहींतर खाऊन टाकली.' ' महासर्प ' 'सारेंच विलक्षण ' या कादंबऱ्या ' सुख कीं दुःख ' हे नाटक, ' म्यॉव्, म्यॉव् ' वगैरे अनेक नाट्यप्रसंग

१९११ सालीं लिहिले गेले. नाट्यप्रसग लिहावे, रा. वासुदेवराव पटवर्धन याच्याकडे जाऊन चर्चा करावी आणि ब्राउनिंग्, वर्डस्वर्थ्वगैरे कवींच्या ग्रथाचा अभ्यास करावा, असा या वेळीं रा. दिवाकराचा कार्यक्रम असे. १९१२, जानेवारी १४ रोजीं 'अभिनव काव्यमाला भा. १' यातील केशवसुत कवीचीं सर्व काव्यें त्यानीं वाचली आणि सायकाळीं प्रो. पटवर्धन यांच्याकडे गेल्यावर त्याच्याशीं केशवसुताबद्दल कुतूहलाने चौकशी केली. हा रा० दिवाकराचा केशवसुतावरील व्यासगाचा प्रारभ. पुढें ही प्रीति सतत वाढत जाऊन केशवसुत हा त्याच्या व्यासंगाचा एक विषय बनला.

या सुमारास रा. दिवाकराचे डोळे बिघडले आणि नोकरीचें काम त्याच्या हातून झेपेना. तेव्हा त्यानी राजिनामा दिला ( १८ एप्रिल ). कारण ११ पासून ८ पर्यंत त्याना ऑफिसात काम पडे. या वेळीं त्याची बदली ए. एस् पी.च्या ऑफिसातून डी. एस्. पी. च्या ऑफिसात झाली. सरकारी तपासणींत डोळे बिघडल्याचें ठरवून रा. दिवाकराच्या इच्छेवरून एप्रिलमध्यें त्यास ' अन्फिट् ' सर्टिफिकिट् मिळालें आणि त्याची सरकारी नोकरी सुटली. ह्याच वर्षी मे २५ पासून 'डिप्रेस्ड् क्लासेस् मिशन्च्या ' सेंट्रल् प्रायमरी स्कूल्मध्यें शिक्षकाचें काम १५ रुपये पगारावर सुरु केलें. ह्या सालीं त्याचे वाचन नाटकापलीकडे फारसें झाले नाहीं. लेखन मात्र बरेंच झालें. डान्टे आणि ब्राउनिंग् याच्या लिहिण्याचा मनावर बराच परिणाम झाला. केशवसुताचीं काव्यें पुस्तकरूपाने छापून काढण्याच्या कामीं रा. गडकरी यास हवी ती मदत करण्याचें याच सालीं रा. दिवाकरानीं कबूल केलें. ( २३ जून, १९१२ ).

हळूहळू आपलें लिखाण प्रसिद्ध करण्याच्या खटपटीस दिवाकर लागले. त्या प्रसंगाची पुढील नोद सापडते. (शुक्रवार, ता ३१ जानेवारी, १९१३). " सहज वाटलें कीं लिहिलेले नाट्यप्रसग प्रो. पटवर्धन व इतर जवळच्या मडळींनीं वाचलेलेच आहेत; तेव्हा केसरीचे रा. केळकर, रा. हरिभाऊ आपटे यास जमल्यास दाखवून तर पहावे ! मनात असा विचार आला आणि जीव अमळ मुठींत धरून रा केळकराच्या माडींत पाऊल टाकलें ! म्हणालें, ' ब्राउनिंग् कवीच्या काव्यलेखनावरून मी मराठींत कांहीं

' मीनोलोग्ज् ' लिहिले आहेत, वेळ असल्यास वाचून दाखवितों. रा. केळकर म्हणाले, ' आता मी गडबडींत आहें. दोन तीन दिवसांनीं या, म्हणजे स्वस्थपणें तास दोन तास बसू.' मी म्हणालों, ' वेळेचा तितकासा प्रश्न नाहीं; आलोंच आहें तर पाच मिनिटातहि एक दोन सहज वाचून होतील.' ते म्हणाले, ' असें का ! मग या आताच आपण बसू.'; आणि आश्चर्य हें कीं, जे आम्ही बसलों ते चागले तास दीड तास ! रा. केळकर म्हणाले, ' बरें, याचें पुढें आता काय करणार आहात ! '. तेव्हा सागितलें कीं, ' नव्यानेच मी लिहितों आहें. कुठे काहीं माझी ओळख नाहीं. आणि शिवाय फुकट कुठे हें छापायला द्यावें असें वाटत नाहीं.' यावर लगेच ते म्हणाले, ' असे करू; ' केसरीं'त हे तुमचे ' पीसेस् ' थोडेसे मी देतों. थोडाफार मोबदलाही देईन त्याचा नतर बाकीचे मग तुम्ही कुठेहि द्या !'. इतकें ठरल्यावर मोठ्या खुषींत सहज आनदाश्रमात शिरलों व दैवयोगानें हरिभाऊ भेटलेही ! त्यास विचारता लगेच ते म्हणाले, 'या, वाचून दाखवा काय लिहिलें आहे तें.' ते स्वतः, त्याची छोटी मुलगी व तिची एक लहानगी मैत्रीण अशीं तिघे ऐकायला बसलीं. वाचता वाचतां जेव्हा 'वर्डस्वर्थ्चें फुलपाखरू !' निम्मे अधिक झालें तेव्हा ते ऐकून हरिभाऊंची कन्या चागलीच हसायला लागली ! त्यावर वडलाना किती आनद झाला पण ! म्हणाले, 'छान आहे ! 'करमणुकीं'त काहीं पीसेस् दिलेत तर जरूर मी छापीन आणि मोबदलाही देईन ! ! "

मार्चमध्यें १५ तारखेस केसरीकरिता काहीं नाट्यप्रसग रा० केळकरांच्या हवालीं केले. या नाट्यप्रसगास ' नाट्यछटा ' असे प्रो. पटवर्धन यांनीं सुचविलेलें नाव रा. केळकर यानीं पसत केलें. आणि बरोबर एप्रिल १५ मगळवार, रामनवमीस केसरीमध्यें दोन नाट्यछटा प्रसिद्ध झाल्या. नाट्यछटांच्या प्रसिद्धीची ही अशी हकीकत आहे.

या सालीं ऑक्टोबर महिन्यांत त्यानीं रा. सीतारामपंत दामले याची गाठ घेतली. रा. हरिभाऊ आपटे याच्या बोलण्यावरून केशवसुताच्या कविता छापण्यास ते तयार असल्याचें कळलें. रा० सीतारामपत यानीं केशवसुताच्या कवितांच्या वह्या लागलीच रा दिवाकरांच्या हवालीं केल्या, व रा.आपटे याच्या

सूचनेवरून प्रसिद्धीसाठीं नकला तयार करण्याचें काम त्यानीं सुरू केलें. आणि डिसेंबरात ७१ नकला रा. हरिभाऊ याच्या हवालीं केल्या. रा. सीतारामपंत-यानीं ह्या वेळीं केशवसुताचे सगळे कागदपत्र रा दिवाकराच्या हवालीं केले. पुढें कसेंबसें रा. हरिभाऊ यानीं केशवसुताच्या कवितेचे पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. परतु आजउद्या झाल्यामुळें रा० हरिभाऊच्या या वर्तनाविषयीं दिवाकरास एकप्रकारची अप्रीति उत्पन्न झाली.

सन १९१४ पासून पुढचें त्याचें चरित्र हें मागें वर्णन केल्याप्रमाणें लेखनवाचन करण्यातच रंगून गेलें होतें. अगदीं अल्प का होईना, पण त्याच्या लेखनाचा मोबदला त्यास या काळात मिळालेला आहे. केसरी-कडून मोबदला मिळाला हा फार मोठा उपकार झाला, असें दिवाकर प्राजळपणे म्हणत असत. ' कारकून ' मनोरंजननें प्रसिद्ध केलें आणि अनेक नाट्यछटा निरनिराळ्या ठिकाणीं प्रसिद्ध झाल्या. प्रो. पटवर्धन, रा. सा. कानिटकर, गडकरी, श्रीधरपत रानडे, बालकवि ठोमरे प्रो. लागू, अण्णासाहेब कारखाननीस, केशवराव दाते, सहस्रबुद्धेमडळी वगैरे मित्र-मंडळीच्या मर्यादित व निवडक परिवारामध्यें त्याचा काळ आनदात जाई. जनकमातोश्री आणि दत्तकमातोश्री, तसेंच पत्नी आणि मुलगा याच्या वियोगाचे दुःखकारक प्रसग त्याजवर या काळात येऊन गेले ते त्यानीं शांतपणें सहन केले ! तथापि त्याचा परिणाम त्याच्या मनावर झाल्या-शिवाय राहिला नाहीं !

१९१५ सालीं 'डिप्रेस्ड् क्लास् मिशन्'चें काम सोडल्यानंतर त्यास 'नूतन मराठी विद्यालया'त जागा मिळाली, आणि तेव्हापासून तेथें त्याचा जम चांगला बसला त्याच्या रोजनिशींतील उल्लेखावरून लोकमान्य टिळक याच्याविषयीं त्यास विलक्षण प्रेम व आदर वाटत असे, असें दिसतें. बालकवि ठोमरे व प्रो. पटवर्धन याच्या मृत्यूमुळें त्यास निःसशय फार दुःख झालें ! आधींच त्याचा परिवार फार लहान आणि त्यात आवडीचीं विश्रातिस्थानें असलेले मित्र गेल्यामुळें साहजिकच त्यास उदासवाणें वाटे. तथापि उरलेल्या मित्रमडळीच्या सगतींत आणि आपल्या प्रिय पुस्तकांच्या वाचनात आपलें चित्त गुतवून व आपल्या एकुलत्या एक मुलीवर आपला सर्व जीव लावून,

ते आपली पुढील जीवितयात्रा शातपणें कंठीत असता एकाएकीं शीतज्वराचें निमित्त होऊन मिति भाद्रपद व॥ ४ शके १८५३ (१ आक्टोबर, १९३१) गुरुवार, या दिवशीं दुपारीं दिवंगत झाले ! !

* कै. गर्गे हे अनेक दृष्टींनीं आदरणीय व्यक्ति होते. त्याची घरची स्थिति गरिबीची होती; त्यामुळें नूतन मराठी विद्यालयातून इंग्रजी सातवीची शालान्त परीक्षा उतरल्याबरोबर त्यास प्रपंचभार शिरीं घ्यावा लागला ! परतु वाङ्मयाभ्यासाच्या जिवंत आनदाची चटक यापूर्वीच त्याना लागली होती. त्यामुळें त्याचा मूळचा शात व आनदी स्वभाव कसल्याहि बिकट परिस्थितींत ढळला नाहीं ! शेक्स्पिअर्च्या नाटकांचा व काव्याचा अभ्यास हा त्याचा अत्यत प्रिय व दृढ असा व्यासंगाचा विषय होता. हरिभाऊ आपटे जर शेक्स्पिअर् वाचून एवढे तयार झाले तर आपण का तसें होऊं नये असें दिवाकर यास वाटत असे. शिवाय शाहूनगरवासींतील कै. गणपतराव याच्या अतुल अभिनयामुळेंही शेक्स्पिअर् अभ्यासाची महत्त्वाकाक्षा फारच अनावर झाली. ती अखेर दिवाकर यानीं तडीस नेली, आणि एके प्रसंगी गणपतरावजींच्या पायावर मस्तक ठेवून तशी कबुली दिली, अशी नोंद त्यानीं आपल्या रोजनिशींत केली आहे. यामुळें कै० प्रि. वासुदेवराबजी पटवर्धनासारख्या वाङ्मयाचार्यांकडे तळ देऊन मिळणारा आनंद ते मनसोक्त लुटीत. शेक्स्पिअर्वरील प्रेमामुळें आम्ही त्यास विनोदानें 'शेक्स्पिअर्' म्हणत असू. वाङ्मयाभ्यासाला उपकारक असा शिक्षकाचा उच्च व पवित्र व्यवसाय त्यानीं पत्करल्यापासून त्यास वाङ्मयसेवेकडेच मन गुतविण्यास अधिक फावलें. तथापि **मी असा नुसता 'मास्तर' म्हणून मरणार नाहीं**, हा मनातला त्याचा पीळ जिव्हाळ्याच्या मित्रमडळात बाहेर प्रकट झाल्यावाचून रहात नसे !

दिवाकर हे आदर्श शिक्षक होते! नियमितपणा, प्रामाणिकपणा, कष्टाळूपणा, व्यवस्थितपणा इत्यादि त्याचे गुण अत्यत वाखाणण्यासारखे होते ! शाळेला एक क्षण उशीर झाला तर ते लगेच कावरेबावरे होत ! वेळेआधीं कधीं मोकळीक झाली तर वेळ सपून घटा होऊन जाईपर्यंत ते शाळेच्याच

---

* 'रत्नाकर' आक्टोबर १९३१—आमचा लेख.

आवारात फेऱ्या मारीत रहात, पण आधीं आवार सोडीत नसत ! घरीं अभ्यास करून घड्याचीं टिपणें सुवाच्यपणें अगाऊ व्यवस्थित लिहून काढल्याशिवाय त्यानीं एक दिवसही वर्गात पाऊल टाकलें नाहीं ! यामुळें समव्यवसायी मंडळींतहि त्याना मोठा मान मिळे ! त्याचा स्वभाव निगर्वी परंतु स्वाभिमानी होता. अपमान ते सहन करीत नसत.

खाणेंपिणें, बोलणें चालणें, सर्व घड्याळाप्रमाणें त्यांचें टीपबद्द असे ! इतकें प्रकृतीला जपत असताही त्यास चाळिशी ओलांडली न ओलाडली तोंच मृत्यूने ओढून नेलें, तेव्हा ' कालोहि दुरतिक्रमः ' हेंच अजूनही खरें!

लहानसें घर, थोडकेंसे उत्पन्न, परंतु ग्रंथसंग्रह मोठा निवडक आणि जिवापलीकडे जपून ठेवलेला ! निर्भीडपणा असा कीं, कपाटावर पाटीच लिहून ठेवलेली होती कीं, ' ग्रंथ कोणी मागू नयेत ' ! द्यावे, हरवावे आणि मग आपण व्यर्थ तळमळावें, हें नको ! त्याच लहानशा दोन खणांच्या खोलींत छोट्या छोट्या कपाटाच्या वरच्या बाजूस भिंतीला कांहीं निवडक चित्रें लटकत ठेवलेली ! त्यात कैसर, वासुदेवराव पटवर्धन वगैरेंचीं कांहीं विशेष कारणावरून निवडलेली चित्रें असत ! तेथें रंगीत चित्रें मुळींच नव्हतीं !

याच खोलीत बसून त्यांचें लेखन–वाचन–मनन चाले ! केशवसुतावरील त्यांचीं टिपणे म्हणजे तसल्या टिपणाचा उत्कृष्ट नमुना म्हणून दाखविता येईल ! ही टिपणे येथेच तयार झालीं ! त्यांचें कुटुंब वारल्यापासून ते मनानें जरा उदासीन असत आणि आपल्या एकुलत्या एक मुलीकडे (कुमारी गोदावरीकडे) पाहून काळ आनदानें कंठीत. ती ' रत्नाकरा'तील कुटुंब, मरण, भूत, नाटक या दृश्यानीं भरलेली अखेरची छटा आणि लागलीच झालेला त्याचा मृत्यु याचा कांहींतरी आणि कसलातरी निकट संबध मनाला भासल्यावाचून रहात नाहीं !

मनाचें औदार्यहि त्यांचें तसेंच ! काय कोठें द्यावयाचें असेल तें स्वतः आणून देत. पुण्याच्या साहित्यसंमेलनाच्या वेळीं आम्ही तीन तीन रुपये घेऊन मंडळीस स्वागत-सदस्य बनविलें. गर्गे यांनीं पत्रिका भरून देण्याचें नाकारून पांच रुपये देणगी दिली ! महाराष्ट्र शारदा मंदिर किंवा त्या-

मार्फत भरलेलीं शारदोपासक संमेलनें यावरही त्यांची भक्ति मनापासूनची असे. वाङ्मयकथा, वाङ्मयचर्चा म्हणजेच त्यांची मेजवानी ! यामुळें पुण्यांतील रविकिरणमंडळांतही ते होते. अर्थात् गिरीश, यशवंत, रानडे, माडखोलकर, माधवराव पटवर्धन यांच्या बैठकींतही ते मधूनमधून असत. तसेंच मायदेव, जोशी, बापूसाहेब चाफेकर, लागूप्रभृतींच्या सहवासाचाही आनन्द ते उपभोगीत. नाट्यवाङ्मयावर त्यांची साहाजिक भक्ति होती; तथापि रा. त्र्यंबकराव ऊर्फ अण्णासाहेब कारखाननीस यांचा त्यांचा संबंध फारच एकात्मतेचा, प्रेमाचा व जिव्हाळ्याचा होता. दातेप्रभृति नटवर्गाशींही त्यांचा स्नेह असे. त्यांच्या प्रिय नूतन मराठी विद्यालयाच्या संमेलनप्रसंगीं भूमिकाही त्यांनीं केलेल्या आहेत. ' कारकून ' त्यांचा या प्रांतांतील अत्यंत उत्कृष्ट व यशस्वी प्रयत्न होय. नूतन मराठी विद्यालयाचे ते अभिमानी विद्यार्थी आणि आदर्श शिक्षक होते ! शाळेचा अभिमान त्यांच्या रोमरोमांत भिनलेला दिसे ! त्यांच्या पश्चात् संस्थनेहि त्यांच्या मुलीच्या शिक्षणाचे कामीं उदारपणें साहाय्य करण्याचें ठरवून स्वतंत्र ठराव करून गौरव केला !

शाळेंत थोड्याच वर्षांनीं निवृत्त होऊन पुढें सर्वस्वीं इच्छित वाङ्मय-निर्मितीच करण्यात आयुर्व्यय करावयाचा त्यांचा संकल्प होता. शिक्षकी-पेशांतच सर्व रक्त खर्चून आटून जाण्यास त्यांचा जीव अगदीं नाखूष होता. प्रपंचाचीही उपाधि पुढें न वाढविता, कोठेही कितीही भारी वेतनाच्या शिकवण्या आल्या तरी त्याही कधीं न करता, बाणेदारपणानें आणि प्रति-ष्ठेनें आपल्या व्यवसायांत कीर्ति व मान मिळवून पुढेंमागें नांव रहाण्या-जोगें वाङ्मय निर्माण करावयाचें ही त्यांची महत्त्वाकांक्षा काळाच्या कुकर्मानें आता धुळीला मिळाली आहे ! तथापि नाट्यछटांचा आद्यप्रवर्तक, आदर्श शिक्षक, ' नव्या युगाच्या नव्या पाइकाचे ' गुरु जे केशवसुत त्यांचा निःसीम अभिमानी व सक्रिय उपासक आणि तुकोबांनीं म्हटल्याप्रमाणें अंगाला 'मळ' लागू न देता जन्मा आलियाचें फळ मिळविणारा एक प्रेमळ, आनंदी आणि सच्चा सज्जन हें त्यांचें थोर यश काळालाही हिरावून घेता येणार नाहीं ! !

टीप—दि. रो. = दिवाकर-रोजनिशी.

# प्रकाशकाचे चार शब्द



महाराष्ट्रांतील आद्य नाट्यछटाकार म्हणून प्रसिद्धि पावलेले **कै. दिवाकर** ऊर्फ **शंकर काशिनाथ गर्गे** हे कालवश होऊन अडीच वर्षें होत आलीं. त्यांनीं लिहिलेल्या चटकदार नाट्यछटा, हृदयस्पर्शी गोष्टी आणि सुंदर प्रहसनें हीं 'केसरी' 'ज्ञानप्रकाश' वगैरे वृत्तपत्रांतून आणि 'मनोरंजन' 'रत्नाकर' सारख्या मासिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालीं असून त्यांनीं महाराष्ट्र रसिक वाचकवर्गाला सुतराम् आकर्षित केलें आहे! अर्थात् त्यांच्या सर्व लिखाणाचें संकलन करून तें ग्रंथरूपानें प्रकाशित केल्यास महाराष्ट्र-वाङ्मयमंदिरांतील एक नवें दालन सुशोभित होईल, ही श्रद्धाच प्रामुख्यानें या आमच्या प्रयत्नाच्या मूळाशीं आहे. शिवाय त्यायोगें महाराष्ट्र-वाचक वर्गाबरोबरच 'बन्धु' या नात्यानें कै. दिवाकर यांचीहि अल्पशी सेवा केल्याचें समाधान आम्हास लाभणार आहे!

वस्तुतः यापूर्वींच हा ग्रंथ प्रकाशित व्हावयाचा. परंतु आधींच नानाविध अडचणींशीं झगडत असतां, कै. दिवाकर यांची एकुलती एक कन्या **कुमारी गोदावरी** हिच्या अकाल निधनानें आमच्या आपत्ति वाढतच गेल्या व हें कार्य अधिक लांबणीवर पडलें.

अशा प्रसंगीं **श्री. अण्णासाहेब कारखाननीस, प्रो. नारळकर, श्री. भागवत** ( शिक्षक, न्यू इंग्लिश स्कूल, पुणें ) यांच्यासारख्या कै० दिवाकरांच्या जिव्हाळ्याच्या स्नेह्यांनीं आम्हास, अशाहि बिकट परिस्थितींत, वेळोवेळीं उत्तेजन देऊन आमचा धीर कायम राखला नसता तर आजहि हा ग्रंथ प्रकाशित करून रसिक महाराष्ट्रवाचकवर्गाची सेवा करण्याचा आनंद आम्हास लाभता ना! वास्तव **कै० दिवाकरांच्या** या स्नेह्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

यानतर छपाईचें सुबक काम येथील 'श्रीगणेश प्रिंटिंग वर्क्स्'चे उत्साही चालक श्री. जगन्नाथ रामचंद्र रानडे ह्यानीं आपलेपणानें आणि तत्परतेनें करून दिलें, याबद्दल त्यांचेहि मनःपूर्वक आभार मानणें आवश्यक आहे.

तसेंच प्रो. दत्तोपंत पोतदार यानीं आमच्या विनंतीस मान देऊन प्रस्तावादाखल या पुस्तकासाठीं कै० दिवाकरांच्या रोजनिशीवरून त्याचें एक त्रोटक चरित्र लिहिण्याचे परिश्रम घेतले व आपला अमोलिक वेळ खर्ची घालूनहि या पुस्तकाबाबत वेळोवेळीं महत्त्वाच्या सूचना करून आम्हास हरप्रकारें साह्याय्य केलें, याबद्दल त्याजविषयींची आमची कृतज्ञताबुद्धि कशी व्यक्त करावी हेंच आम्हास समजत नाहीं !

सदरहू ग्रंथ कै० दिवाकर याचे इच्छेप्रमाणें त्याचे परम मित्र कै० प्रि. वासुदेवराव पटवर्धन याचे 'स्वर्गस्थ आत्म्यास' अर्पण केला आहे !

ता. २५।१२।३३ — दिवाकरबन्धु.
२९५ शनिवार, पुणें.



# अनुक्रमणिका

## नाट्यछटा

## गोष्टी, प्रहसनें व 'कारकून' नाटिका



  

# अर्पण-पत्रिका



कै० दिवाकर ऊर्फ शं. का. गर्गे

याच्या

अंतकालच्या इच्छेस अनुसरून

सदर ग्रंथ

त्याचे परम स्नेही

कै० प्रि० वासुदेव बळवंत पटवर्धन

याचे



स्वर्गस्थ आत्म्यास

अर्पण केला आहे.

—प्रकाशक

# नाट्यछटा.



[इंग्रजी वाङ्मयाचा परिचय झाल्यापासून मराठी भाषेमध्यें वाङ्मयाचे अनेक नवीन प्रकार यापूर्वी आलेले आहेत अथवा येऊं पाहत आहेत. त्यापैकींच प्रस्तुतचा 'नाट्यछटा' हा एक प्रकार होय. इंग्रजी कवी ब्राउनिंग याच्या एकपात्री संभाषणावरून 'दिवाकर' यास हा नवीन प्रकार सुचला असावा असें दिसतें. या प्रकारांत आपल्या जुन्या 'भाणा'प्रमाणें एकच पात्र बोलणारें असून, अनेक पात्राच्या संभाषणाचा देखावा दाखविला जातो. पण पात्रें वांचविणें—कमी करणें—या नुसत्या काटकसरीपेक्षां या प्रकारांत दुसरा एक फायदा आहे तो हा कीं, एकच पात्र बोलणारें असल्यामुळें भाषणाचा ओघ एकच राहून एकाच लहानशा मनोभावनेचा परिपोष होऊन तल्लीनता प्राप्त होते. शिवाय सदर वाङ्मयप्रकारातील मूळ हेतूही उच्च आहे, व त्या हेतूप्रमाणें वाचकांच्या मनाला त्यापासून कांहीं तरी सद्बोध होईल असें आम्हास वाटतें.—के. क.]

केसरी, १५ एप्रिल १९१३



# महासर्प.

“.. .कोणरे तूं? चल दूर हो!–या गुलाबाच्या फुलाला पुनः हात लाव कीं तुला अगदीं कडकडून डसलेंच म्हणून समज!–अरे तुम्हीं माणसें आपसांत काय वाटेल तें करा–एकमेकांचे गळे कापा–रक्त प्राशन करा–आणि खुशाल मजेनें ढेकर देत बसा! त्या तुमच्या सुखाच्या आड कोणी येत नाहीं!–जा बरें, बाबा! असंतोषानें रात्रं-दिवस डोकीं कोरीत बसणाऱ्या त्या आपल्या मनुष्यसृष्टींत खुशाल जाऊन बैस! अरे, आपली मनें उजाड करतां तीं करतां–आणि आमच्या या सुदर वनालाही उजाड करूं पाहतां? किती सुंदर गुलाबाचें फूल हें! पहा कसें आनंदानें उड्या मारीत आहे!-तो पहा! तो ढग आकाशांत दूर एकटाच फिरत आहे!–त्यालासुद्धा याच्या बाललीला पाहून किती आनंद झाला आहे! या वनांतली मौज पहात तो कसा स्वस्थ उभा आहे!-नको! हें सुंदर–चिमकुलें–फूल तोडूं नकोस! अरे, हें आमचें भावंड आहे! समज, हें तूं तोडून नेलेंस, तर–मला, माझ्या या सगळ्या भावंडांना, या ढगाला, आणखी आमच्या प्रेमळ आईला किती दुःख होईल!–तुमचें लहानसें बालक काळानें आपल्या घरीं खेळायला नेलें, तर तुम्हांला किती बरें शोक होतो?–कमलाकरा, या सुंदर–सुवासिक–फुलाला आमच्या हातून हिसकावून नेऊन तूं काय करणार? आपल्या पत्नीलाच देणार ना! अरे, आईच्या स्तनापासून तूं तट्कन ओढून आणलेलें हें मूल तिनें पाहिलें, तर ती चट्कन रडायला लागेल!–जा, तुझ्या प्रियेलाच येथें घेऊन ये, म्हणजे ती या पुष्पाचें चुंबन घेईल, त्याच्याकरितां गाणीं गाईल,—आणखी, तिचें मधुर गायन ऐकून मला–आमच्या

आईला–या वनाला–एकंदर सर्व सृष्टीला–किती आनंद होईल ! तुझी लाडकी प्रेमाचा वीणा वाजवायला लागूं दे, कीं आनंदानें मी अगदीं डोलायला लागेन ! मी अतिशय रागीट आहें खरा,–पण प्रेमानें मला कोणी जवळ घेतलें, तर कधीं कोणावर मी रागावेन का ?. .."

लेखन ता. १८ सप्टेंबर १९११ सोमवार.

प्रकाशन–केसरी, ता. १५ एप्रिल १९१३



*

# फाटलेला पतंग.

“. . .छे ! आता कोठून मी धड व्हायला ! अशा फाटलेल्या स्थितींतच फडफड—रडरड—करीत मला किती काल कंठावा लागणार आहे, तें एका ईश्वरालाच ठाऊक !— अहो ! नका ! त्या आकाशाकडे पाहूं नका ! हरहर ! हेंच निरभ्र आकाश निराशेची घरघर लागलेल्या प्राण्याला सुद्धा गोड—सुंदर—अशीं मोठमोठीं स्वप्नें पाडून—बिचाऱ्याला नादीं लावून—कधीं म्हणून लवकर मरूं देत नाहीं बरें ! अशा स्वच्छ आकाशांत, अमळ वारा आनंदानें खेळूं लागला कीं, अंत:करणांत गुंडाळून ठेवलेली—सदैव आनंदाश्रू व दु:खाश्रू यांनीं भिजलेली माणसाची कल्पनाशक्ती—जगाच्या दुर्लक्षपणानें हूं म्हणतांच—जिवाला इतक्या कांहीं उचच उच भराऱ्या मारीत घेऊन जाते कीं, शेवटीं पश्चिमेच्या अंकावर अर्धवट झोंपी गेलेला सूर्य एकदम जागा होऊन विचारतो कीं, ‘ नभोमंडलांत माझ्यामागें इतक्या वैभवानें हा कोण बरें महात्मा तळपतो आहे ?’—पण अरेरे ! तो वैभवाचा क्षण आत्म्याला मिळतो—न मिळतो—तोंच ‘ ओढा खालीं ! खालीं खेचा ! नाही तर तो वेडा होऊन, कोठें तरी भडकेल !’ अशी एकच जगाची हाकाटी सुरू होते ! मग काय ? खालीं जग, वर स्वर्ग, या उभयतांच्या जोरानें—अगदीं निकरानें—चाललेल्या ओढाताणीमध्यें बिचाऱ्या जिवाची—हाय !—किती भयंकर दशा होते म्हणून सांगूं तुम्हाला !—नको ! त्या दिवसाची—त्या स्थितीची, आठवण सुद्धा नको ! अहो ! एके काळीं धड असलेला हा फाटका पतंग, अशाच जगाच्या व स्वर्गाच्या ओढाताणीमध्यें सांपडला होता बरें ! अहाहा ! किती सुखाचा—माझ्या पूर्ण भाग्याचा—दिवस होता तो ! ब्रह्मानंदाकडे

न्यायला आलेला शीतल वायू कसा अगदीं मिठी मारून कीं हों मला घेऊन चालला होता ! जगाला मी पूर्ण विसरून—पण होय ! जग कोठें मला विसरलें होतें ? माझी किंमत किती ? तर [१]अधेला पण त्याचासुद्धा जगाला कांहीं केल्या लोभ सुटत नाहीं ! शेवटीं जग मला खेंचूं लागलें—'स्वर्ग जातो ! स्वर्ग जातो !' असें म्हणून मी मोठ-मोठ्यानें रडूं लागलों—अगदीं सुचेनासे होऊन संतापाच्या—सोसाट्याच्या—वावटळींत सांपडून धाड्कन्—या बाभळीच्या झाडावर येऊन आदळलों ! आतां हें फाटलेलें हृदय कधीं तरी धड होईल का हो !—नाहीं !—नाहीं !—नाहीं !!—उलट मी आता दिवसानुदिवस अधिकाधीक असा विरतच जाणार !—अहो ! माझ्या स्थितीबद्दल रडूं नका ! आधीं ऐका ! एकदा धड असलेल्या पतंगाचें—या बाभळीच्या काट्यांवर बसून अहोरात्र रडणारें—कण्हणारें—फाटत चाललेलें पिशाच्च काय सांगतें तें ऐका ! [२]गर्वानें भराऱ्या मारूं नकोस ? भराऱ्या मारूं नकोस ! नाहीं तर अस्सा फाटून—जन्मभर, जन्मभर—रडत बसशील !... "

लेखन ता. २६ जानेवारी १९१२.

प्रकाशन—केसरी ता. १५ एप्रिल १९१३

सुधारून—साहित्यसोपान—एप्रिल १९३१

---

१ साहित्यसोपानात दिवाकरानी सुधारलें तें असें:—" माझी किंमत किती ! पण तिचा सुद्धा..." २ 'गर्वानें' शब्द ( सा. सो. ) सुधारताना गाळला.



*

# बाळ! या नारळाला धक्का लावूं नकोस बरें!

"...बाळ वेणुबाई! असें काय बरें वेड्यासारखें करावें? हें बघ, हा नारळ किं नाहीं, फोडण्याकरितां देव्हाऱ्यांत ठेवलेला नाहीं! याला रोज सकाळीं गंध, अक्षता, फुलें वाहून याची पूजा करायची!— पूजा कशाला करायची? वेडी पोर! ऐक, मी काय सांगतों तें. एके दिवशीं रात्रीं काय झालें,—आपल्या बागेंत बंगल्याशेजारीं नारळाचें मोठें झाड आहे तें?—त्या झाडाखालीं, श्रीरामचंद्र, लक्ष्मण-सीतामाईबरोबर गोष्टी सांगत बसलेले तुझ्या पणजोबांना स्वप्नात दिसले! सकाळीं ते जे उठून पाहतात, तों आपला एक नारळ त्या झाडाखालीं पडलेला! झालें! देवाचा प्रसाद म्हणून पणजोबांनीं तो घरीं आणला, त्याचीं सालपटें काढलीं, मग देव्हाऱ्यांत ठेऊन त्याची पूजा केली! रोज या नारळाची पूजा करावयाची असा त्यांनीं आपला नेम चालविला. पुढें देवाच्या दयेनें त्यांना पुष्कळ पैसा मिळाल्यावर, त्यांनीं याला चांगला सोन्यानें मढविला! बघ, कशी खऱ्या नारळाच्या शेंडीसारखी जरीची शेंडी आहे ती! झालेंच तर ही मखमलीची पिशवी, त्याला बसायला रेशमी कापडाची मऊमऊ गादी——पाहिलीसना कशी छानदार आहे ती?——काय? काय म्हटलेंस? या नारळांत——या जरीनें, सोन्यानें मढविलेल्या नारळांत गोड गोड पाणी!——चांगलें खोबरें असेल? हः हः वेडी रे वेडी! बेटा वेणुबाई! या नारळांत आतां कोठून खोबरें व पाणी असायला? पणजोबांना ज्या वेळेस तो झाडाखालीं सांपडला त्या वेळेस त्याच्यांत खोबरें आणि पाणी असेल! त्या गोष्टीला जवळजवळ आतां दोनशें वर्षें व्हायला आलीं! आतां या नारळांतलें पाणीही नाहींसें झालें आहे

व खोबरेंही नाहींसें झालें आहे !–मग यांत आहे काय? बेटा! करवटी सोन्याची, शेंडी जरीची, पण आंत किं नाही, सडलेली, कुचकी, अशी निवळ घाण आहे! आतां कांही तो खाण्याच्या उपयोगाचा नाहीं! समजलें आतां? तो देण्याबद्दल आतां पुनः नाहीं ना कधीं हट्ट धरायची?...."

लेखन ता. २४ नोवेंबर १९११.

प्रकाशन–केसरी, २२ एप्रिल १९१३.



# काट्यां! अजून कसें तुला जगांतलें ज्ञान नाहीं ?

"....थांब ! अशानें थोडाच तूं ताळ्यावर येणार आहेस ! नुसत्या छडीनें नाहीं भागायचें–चांगला या चाबकानेंच तुला सडकला पाहिजे !—चूप ! खबरदार ओरडशील तर ! आणलीस तापवलेली पळी ? ठीक. आण ती इकडे ! धर याला नीट, अस्सा ! चांगला चरचरून डाग बसला तोंडाला !—रडूं दे, रडूं दे लागेल तितका ! कायग, या त्रिंब्याला अक्कल तरी केव्हां येणार ? आतां का हा लहान आहे ? चांगला सहा वर्षाचा घोडमा झाला आहे ! पण अजून कसें तें व्यवहारज्ञान नाहीं !–नाहीं पण मी म्हणतों, कांही जरूर पडली होती मध्यें बोलण्याची याला ? मी इकडे गणपतरावांना सांगतों आहे कीं, तुमची दहा रुपयांची नोट पडलेली इथें काहीं कोणाला सांपडली नाहीं म्हणून ! पण इतक्यांत आमचे हे दिवटे चिरंजीव आले ना !—आल्याबरोबर यानें त्या गृहस्थाला सांगितलें कीं,—तरी मी इकडे चागला डोळ्यानी दाबतों आहे !—पण या गाढवाचें लक्ष असेल तर !—म्हणे 'तुमच्या खिशातून काल कागद पडला होता, तो किनई मी बाबाच्या जवळ नेऊन दिला'–चूप बैस ! खोटें बोलतोस आणखी ? असें नाहीं तूं त्यांना म्हणालास ?-अग यानें सांगितल्याबरोबर, माझ्या जिवाची कोण इकडे त्रेधा ! मग कांहीं तरी आठवल्यासारखें केलें, मुद्दाम कागदपत्रांची दहा पांच पुडकीं उलथीं पालथीं केलीं, अन् खिशांत असलेली नोट हळूच कशी तरी त्या गणपतरावांना काढून दिली !–असा संताप आला होता त्या वेळेला या कार्ट्याचा !-पण त्यांच्या देखत 'नेहमीं अशीच मला शहाणपणानें आठवण करीत जा बरें बाळ !' असें म्हणून ते जाईपर्यंत या त्रिंब्याची

मला वरचेवर पाठ थोपटावी लागली ! कशी लक्ष्मी चांगली घरांत चालून आली होती !-पण या कार्ट्यापायीं,-अरे कार्ट्या ! अजून कसें तुला जगातलें ज्ञान नाहीं!-तें कांहीं नाहीं ! या पोरट्याना उठतां बसतां नेहमीं सडकलेंच पाहिजे ! त्याशिवाय नाहीं यांना जगांतलें ज्ञान यायचें !—स्वयंपाक झाला आहे म्हणतेस? चला तर घ्या आटपून. चंडिकेश्वराच्या देवळांत लवकर मला गेलेंच पाहिजे! आजपासून तिथें प्रख्यात काशीकरशास्त्री श्रीमद्‌भगवद्गीतेवर पुराण सांगायला सुरुवात करणार आहेत ! चला तर लवकर !—'त्रिंब्या, थांबलें कीं नाहीं तुझें अजून रडणें? कां पाहिजे आहेत तडाखे आणखी'? "

लेखन ता. १८ नोवेंबर १९११
प्रथम छापली, केसरी २२ एप्रिल १९१३
सुधारलेली, "महाराष्ट्रसाहित्य" खास अंक जुलै १९२३.



# *अशा शुभदिनीं रडून कसें चालेल ?

"..एकूण तें सगळें खोटेंच तर ? माझ्या या कपाळावरचें कुंकूं हळूच आपल्या प्रेमळ—हो कसचें प्रेमळ !—बोटानें—हेच नव्हे कां तें ?—यानेंच पुसून टाकून आपण कोणीकडे बरें गेला होता ? स्वर्गाला ?—नाथ ! या हृदयातून—सदैव प्रेमाचीं गाणीं म्हणणाऱ्या माझ्या या अंत:करणांतून—बाहेर पडायला आपण मला कधीं बरें विचारलें होतें ? आणि मी कधीं जा म्हणून सांगितलें ?—पण जाऊं द्या आतां ! तें सगळें स्वप्नच होतें ? कारण, या स्वच्छ व झुळझुळ वाहणाऱ्या प्रवाहामध्यें माझ्या कपाळावरचा कुंकुमतिलक कसा नक्षत्रासारखा आनंदानें चमकत आहे ! प्रेमानें नाचत आहे ! प्राणनाथ ! या हिरव्यागार गालिचावर आपणाला बसवून—मी नाहीं जा ! या मांडीवर बसून अशी मी या गळ्याला निरंतर मिठी मारून बसणार ! अगबाई ! पाऊस पडत आहे ! अहाहा ! नाथ कसें सुंदर इंद्रधनुष्य उगवलें आहे इकडे ! काय म्हटलेंत ? हें स्वर्गाचें महाद्वार उघडलें आहे ? खरेंच ! या सायंकाळच्या वेळेला आपल्या मेंढ्यांना—पाहिलेंत ना ?—कशी चकचकीत सुवर्णासारखी, नुकत्याच उमटलेल्या गुलाबासारखी, लोंकर आहे त्यांच्या अंगावरची ?—या मेंढ्यांना घेऊन हा मेघ—हा वृद्ध मेंढपाळ—नेत्रांतून आनंदाश्रू गाळीत कसा त्या स्वर्गद्वाराकडे हळूहळू चालला आहे पण !—असें काय गडे ! कोठें जायचें

---

*मूळ मथळा:—'चाडाळणी ! अशा शुभ दिनीं रडूं नकोस !' हा होता. आणि अखेरीस "बाबा हसायला लाग ! हा ! काय ! अग ! पण चाडाळणी ! रडूं नकोस ! अशा शुभदिनीं रडूं नकोस !" असा मजकुर होता. पुढें वर छापल्याप्रमाणें दिवाकरांनी सुधारून ठेवला होता.

आहे आपणाला ?—हंसतां काय ?—बोला गडे !—मी आपणाला आतां क्षणभर सुद्धा कोठें जाऊं द्यायची नाहीं !—थांबा ! कोठें जायचें आहे तें मला नाहीं का सांगत? नाथ! मी येऊं का—येऊ का आपल्याबरोबर? खरेंच सांगतें, आपण जर मला टाकून गेलां, तर तडफडून मरेन हो ! आपल्याशिवाय मला आतां कोण बरं प्रेमानें जवळ घेणार आहे? —दोनच महिने झाले, माझी आई कि नाहीं मला टाकून गेली आहे! —नाहीं ! नाहीं ! ! माझ्या या घट्ट मिठींतून मी आपणाला मुळींच जाऊं देणार नाहीं ! प्राणनाथ! माझे हात तुटले तरी—हाय! हाय!! येथें कोण आहे !—काय ? मला कायमचे टाकून गेले ? आतां त्यांना मी मिठी मारली होती ना ? मग या घट्ट मिठींत काय आहे ! तडफड-णारें !— न मरणारें !— हें माझेंच हृदय आहे !—काय ? बाहेर बँड-बाजा वाजत आहे ! समजलें ! बाबा आता नव्या आईला आणायला चालले आहेत !—इतकी कशी गाढ झोंप मला लागली पण ? किती गोड स्वप्न !—पण तें स्वप्नच ! आई !— आई ! !—तडफडूं नकोस ! हृदया ! तडफडूं नकोस ! बाबा, हंसायला लाग ! कारण—अशा शुभ-दिनीं रडून कसें बरें चालेल ?

लेखन ता. २३ नोवेंबर १९११.
प्रकाशन केसरी १३ मे १९१३



# जातिभेद नाहीं कोठें ?

"..ही अशी लटपट नको आहे ! म्हणे पुष्कळांचें मत आहे कीं, ईश्वरानें जातिभेद निर्माण केला नाहीं म्हणून ! असेल ! एका पुष्कळाचें जसें हें मत आहे तसेंच जगातल्या दुसऱ्या पुष्कळांचेंही मत आहे कीं, ईश्वरानेंच जातिभेद निर्माण केला आहे !– मी असें विचारतों कीं, आपल्या मानवसृष्टिखेरीज इतर जीवसृष्टींत परमेश्वरानें जातिभेद निर्माण केला आहे कीं नाही ?–फार कशाला ? या वनातलीच मौज पहा की, अहो, काही झाडांना नुसतीं सुवासिक फुलेंच आहेत, तर काहीं दिखाऊ–पण अत्यंत सुंदर–अशाच फुलांनीं नटलेली आहेत ! पहा, तो आम्रवृक्ष पहा ! त्याला सुवासिक मोहरही आहे व गोड फळेंही येतील ! बिचाऱ्या सुरूच्या झाडांना तर फुलेंही नाहींत आणखी फळेंही पण नाहींत ! पण त्याची, वायूच्या लहरीमध्यें डुलत डुलत स्वर्गाला जाऊन भिडण्याची धडपड अव्याहत चालू असते कीं नाही ? तसेंच पक्ष्याचें ! कोणी गाणारे आहेत, कोणी सुंदर आहेत, तर कांहीं–पहा ती घार ! ओहोहो ! आकाशात उंच भराऱ्या मारीत चालली आहे !–हो मग, मी तरी तेंच म्हणतों, पशूमध्येंही हाच प्रकार आहे ! अहो, इतकेंच नाही; पण गुलाबांच्या झाडांमध्येंसुद्धा किती तरी जाती आहेत ! मला सांगा, सगळ्या जगांत पोपट तरी एकाच जातीचे आहेत कां ? मुळींच नाहीं. अहो, प्रत्यक्ष माणसाला कोठें नको आहे जातिभेद ? हो आपल्यालाच मी असें विचारतों कीं, तुम्ही आपल्या बागेंत नुसतीं गुलाबाचींच झाडें का नाहीं लावीत? पाहिजे कशाला जाई जुई मालती मोगरा ?–तें काहीं नाहीं ! माणसाचा स्वभावच हा कीं, आपल्या

वर्तनांतील दोषांचा डेरा कोणाच्या तरी माथीं तो आदळीत असतो! —वा! काय कोकिळा मधुर गात आहे! कां हो त्रिंबकराव, आपल्या भोंवती मधून मधून जें एवढें हें गवत पसरलें आहे, त्यामध्यें रडून रडून वाळलेली एक तरी गवताची पात तुम्हाला दिसत आहे कां? तीं नारळाचीं झाडें आमच्यापेक्षां कां उच आहेत, आणि आम्हाला तूं इतकें उंच का करीत नाहींस?— अशी याची ईश्वराजवळ चालू असलेली ओरड तुम्हाला कोठें ऐकूं येत आहे कां? कोकिळा गात आहे म्हणून इतर पक्षी गायचे थोडेच थांबले आहेत! आपल्या बंधूजवळ जितका मोहोर आहे तितका आपल्याजवळ नाहीं, म्हणून हा आम्रवृक्ष मत्सरानें सुकून गेला आहे का? सांगा, अगदीं लहानशा गवताच्या पातीला जितका आपल्यांतील ईश्वरी तेजाविषयीं अभिमान वाटतो, तितकाच, उंच हात पसरून आपल्या लहान भावंडांना वारा घालणाऱ्या त्या नारळाच्या झाडालाही वाटतो! जगाचें सौंदर्य वाढविण्याची परमेश्वरानें आपल्यावर सोंपविलेली कामगिरी, जितक्या उत्साहानें व कळकळीनें तें गुलाबाचें फूल बजावीत आहे, तितक्याच उत्साहानें व कळकळीनें हें झेंडूचें फूलही नाही का बजावीत?-हें पहा! या आनंदानें स्मित करणाऱ्या व शात वनांत दुःखाचा एक तरी सुस्कारा ऐकूं येत आहे कां?—नाहीं तर आपल्या शहराकडे नजर फेंका! जिकडे तिकडे मीपणाची आग भडकून त्यांत तरफडून —भाजून—निघणाऱ्या तूपणाच्या हृदयांतून अव्याहत बाहेर पडणाऱ्या धुराचें—त्रिंबकराव!—कसें हें आच्छादन पसरलें आहे?—काय म्हटलेंत? हा सगळा धूर जातिभेदानें धुमसणाऱ्या तव्यांतून बाहेर पडत आहे?—नाहीं! तसें नाहीं! अहो! ईश्वराला जाणून बुजून पायाखालीं तुडवून, सर्व जगाचा मी एकटा मालक असावा, या इच्छेनें

अनावर होऊन, एकमेकांवर टाळकीं फोडून घेणाऱ्यांच्या मेंदूंतून या वाफा निघत आहेत—वाफा ! 'मी ! मी !' अशी रणगर्जना जिकडे तिकडे ऐकूं येत आहे !...."

लेखन ता. ३१ डिसेंबर १९११.

प्रकाशन, केसरी, मे १३ १९१३.



# म्याऊं-म्याऊं-म्याऊं !

"....देवा ! माझीं पिलें भुकेनें कशी व्याकूळ रे झालीं आहेत ! तीन वाजून गेले, पण अजून यांच्या पोटांत, घासभर कीं रे अन्न गेलें नाहीं ! बाळांनों ! उगी, नका रडूं ! मी पुनः खालीं जातें—अगदीं हलूं नका. या गलथ्यातच अमळ एकमेकांशीं खेळत बसा !—स्वयं-पाकघरांत जातें, आणि कांहीं उष्टें अन्न पडलें असेल, तें माझ्या बाळांकरितां घेऊन लवकर येतें ! जाऊं ?—आज घरांत येवढें काय आहे ? काय सांगू तुम्हाला ! मुलानों, आज किं नाहीं माझा वाढ-दिवस—माझ्या पूर्वजन्मींच्या मनुष्यदेहाचें वर्षश्राद्ध आहे ! खरें म्हटलें, तर हें माझेंच घर—हीं माझींच मुलें,—पण या घरांतल्या मुलाना काय ठाऊक कीं, मी त्याचीच आई आहे म्हणून ! त्यांना वाटतें—त्यांनाच काय ?—सर्व जगाला वाटतें कीं, आपले सगळे पूर्वज स्वर्गाला जातात म्हणून ! पण किती तरी ठिकाणीं, मनुष्यदेहाचें जीर्ण वस्त्र फेंकून देऊन पशुपक्ष्यांचें कातडें अंगावर घेऊन आम्ही !—आम्ही आपल्या मुलालेकरांभोंवती प्रेमानें वावरतों, त्यांची सेवा करतों—आणि उलट त्याच्या लाथाबुक्याचे—चाबुकांचे—तडाखे सोशीत धाय मोकलून रडत कीं रे असतों ! पण बाळांनों, जगाला निवळ देह—कातडें—माती !—प्रिय आहे ! आत्म्यावर जगाचें खरें प्रेमच नाहीं ! जोंपर्यंत मी मनुष्य-देहानें नटलें होतें, तोंपर्यंत हीं घरांतलीं माझींच मुलेंलेंकरें कशीं मजवर प्रेम करीत होतीं ? पण मी माजर होऊन घरांत फिरूं लागल्या-पासून, मला कोणी जवळसुद्धा उभें राहूं देत नाहीं ! देवा ! आज माझाच वाढदिवस, आणि मलाच कां रे अन्न—पानांतलें घासभर उष्टें अन्नसुद्धा—मिळूं नये ! पण या घरांतल्या मुलांना तरी काय ठाऊक,

कीं मी त्याचीच आई आहे? तसें असतें तर मघाशीं मी नुसती स्वयंपाक घरांत डोकावलें मात्र, तोंच 'राडे! नीच!' असें म्हणून माझ्या वेणुनें—प्रत्यक्ष माझ्या लेकीनें!—ताडकन् माझ्या डोक्यांत लाटणें फेंकून कशाला बरें मारलें असतें!—बाळांनो! नका रडूं! मी आतां खालीं जाऊन येतें!...."

लेखन ता. ८ डिसेंबर १९११.
प्रकाशन केसरी, २७ मे १९१३.



# एका नटाची आत्महत्या.

“ .... ओढ ! जगा, असेल नसेल तितकी शक्ती खर्च करून ओढ !–हं चालूं दे ! दांत ओंठ खाऊन अगदीं जोरानें–अस्सें ! चालूं दे !–आलों, आलों ! थांबा, भिऊं नका !–अरे वेड्या जगा, कां उगीच धडपडत आहेस ? हं ! नको आपल्या जिवाला त्रास करून घेऊस ! माझें ऐक. सोड मला, एकदा दोनदा तू मला परत फिरविलेंस–काय सांगितलेंस ? काय माझें समाधान केलेंस रे तू ? निव्वळ आरडाओरडा ! 'वाहवा, वाहवा ! भले शाबास ! खुप बहार केलीस ? ' –बेशरम ! हंसतोस काय ?–अरेरे ! तुझ्या नादीं लागून आजपर्यंत या तोंडाला रंग फासला काय–नाचलों काय--रडलों--हसलों !--हाय ! जिवाची चेष्टा--या जिवाची विटंबना केली ! नको ! नको ! ! मला ओढूं नकोस ! ! !--काय वाऱ्याचा सोसाटा हा ! जिकडे तिकडे धूळ आणि पाचोळाच--पाचोळा उडाला आहे !--अबब ! केवढा प्रचंड सर्प हा ! घाल, खुशाल माझ्या अंगाला विळखा घाल ! अरे जारे ! कितीही जोरानें तूं मागें ओढलेंस, तरी मी थोडाच आतां मागें फिरणार आहे ! खुपस, मस्तकांतून अगदीं पायांपर्यंत तू आपला–अस्सा हा ! चालूं दे !–दांत खुपस ! नाहीं ! मी परत फिरणार नाहीं ! जा --ओरडा ! मोठमोठ्यानें आरोळ्या मारा ! टाळ्या वाजवा ! नाटकी-ढोंगी–पणानें सगळें जग भरलें आहे ! अरे जगायचें तर चांगलें जगा ! नाहीं तर चला दूर व्हा ! अरे नका ! माझ्या तोंडाला चुना-काजळ-फासूं नका ! कोण ? कोण तुम्ही ? मला फाडायचें आहे ? तें कां ? मी कशानें मेलों तें पाहायचें आहे ! सलफ्युरिक ॲसिड प्यालों आहें मी, सलफ्युरिक ॲसिड !–अहाहा ! काय गार वारा सुटला आहे

हा ! जिकडे तिकडे बर्फच—बर्फ ! अनंतकाल झोंप—चिरकाल झोंप ! —हः हः वेड्या जगा ! माझीं आतडीं आपल्या कमरेभोंवती गुंडाळून मला मागें खेचण्यासाठी कां इतका धडपडत आहेस ? अरेरे ! बिचारा अगदीं रडकुंडीस आला आहे ! काय, काय ? माझें आतां गूढ उकलणार ? अहाहा !—उलथलें ! जग उलथून पडलें ! ओहो!....

लेखन ता. ७ नोवेंबर १९१२.

प्रकाशन—केसरी ५ आगस्ट १९१३



# म्हातारा इतुका न । अवघे पाउणशें वयमान ॥

" ..अहो छे हो ! तिला आणखी तिच्या मुलाला मरून अजून पुरते दोन महिनेसुद्धा झाले नाहींत ! प्लेगचेच दिवस होते ते ! काहीं फार दिवसाची गोष्ट नाहीं मी सागत तुम्हाला —हा तिला बिचारीला स्मशानात एकटीला चैन पडलें नसेल, म्हणून माझ्या दामूलाही घेऊन गेली असेल झालें! असो, जशी ईश्वराची इच्छा !—यमू म्हणजे माझी प्रत्यक्ष सख्खी चुलत बहीण ! ती प्लेगानें आजारी पडून, तिला वायू झाला आहे, हीं अक्षरें दामूच्या पत्रात दिसायचा अवकाश, तों मला जें कांहीं रडूं कोसळलें, तें काही पुसूंच नका ! किती वेळां तरी मनांत आलें कीं,तिच्याकडे जावें म्हणून ! पण अगदीं नाइलाज होता !—एक तर ते प्लेगचेच दिवस, व दुसरें असें कीं, घरामध्यें इकडे माझ्या नातवाचा दिवाळसण ! आणि त्यातून, पुण्यापासून मुंबईपर्यंतच्या प्रवासाची दगदग ! या वृद्धावस्थेंत, दम्यानें अगदीं गाजलेल्या या जिवाला, कशी बरें सहन झाली असती ! नाहीं, तुम्हीच सागा !— अनंतराव, काय सागू तुम्हाला ! ते दोन दिवस माझा जीव कसा अगदीं काळजीच्या भोंवऱ्यात सापडला होता !— अहो पुढें काय ? प्रारब्ध माझें ! दामूच्या पत्रानंतर अगदीं चौथ्या दिवशीं सकाळींच, त्याच्या एका स्नेह्याचें पत्र आलें कीं, माझी यमू व तिचा तो दामू, दोघेही बिचारीं प्लेगाच्या वणव्यात सांपडून तडफडून मेलीं म्हणून ! दु:खाचा अगदीं पर्वत कोसळला होता माझ्यावर !— पण तसाच धडपडत कसा तरी एकदाचा चार पांच तास मुंबईस जाऊन, दामूच्या मित्रानें मोठा—सच्चा माणूस !—जें कांहीं त्याचें किडूकमिडूक ठेवलें होतें, तें सगळें कांहीं मी येथें घेऊन

आलों !—आतां त्यांच्या घरादारांची व शेतांची कांहीं तरी व्यवस्था मला नको कां करायला ? माझ्या यमूला आतां मीच काय तो एकटा वारस—हर हर ! या प्लेगाच्या वादळानें त्यांचा वंशवृक्षच कि हो कोसळून पडला ! कठीण !-काळ मोटा कठीण येत चालला आहे ! असो ! पण का हो अनंतराव माझ्या यमूचीं घरेंदारें व शेतें आतां माझ्या कबज्यात यायला कांहीं मार्गांत अडचणी तर नाहीं ना येणार ?.... ”

प्रकाशन, केसरी, ५ आगस्ट १९१३.
लेखन ता. ४ नोवेंबर १९११.



# पंत मेले-राव चढले.

( पताच्या घरीं. )

" .... असें काय ? सोड मला ! चिमणे, असें वेड्यासारखें काय करावें ? रडतेस काय ? जा ! दार लावून घे—घरांत आपला गोपूबाळ निजला आहे ना ? त्याच्याजवळ जाऊन बैस हं ! रडूं नकोस, जा !—आई आब्रासाहेबांकडे भात सडायला गेली आहे, ती आतां इतक्यांत परत येईल ! जाऊ मी ? रडायची नाहींस ना ? भूक लागली आहे, म्हणून का तूं रडतेस ?—असें काय ? चिमे, मी येईपर्यंत तूं अगदीं गप्प रहा हो !--आईनें दळून ठेवलेलें हें पीठ यमुनाबाईच्या घरीं पोंचवितों, आणि तसाच माधुकरी मागून मी लवकरच परत येतों ! मग माझ्या ताईला भात, वरण, भाकरी—माधुकरी म्हणजे काय ? ताई ! माधुकरी मागणें म्हणजे भीक मागणें हो !—लोक आपल्याला भिकारी म्हणतील ? म्हणूं दे ? बाबा देवाच्या घरीं गेले आहेत; त्यानीं देवाला सांगितलें म्हणजे मग देव आपल्याला श्रीमंत करील !—बाबा केव्हा येतील ? छे ! ते आता कुठले यायला ! हें बघ ताई ! तूं बाबांच्याबद्दल पुनः कधीं आईला विचारूं नकोस हो ! ती किं नाहीं लागलीच रडायला लागते !-कोण, आई केव्हां आलीस ? हें ग काय !—आई ! आई !! कां ग अशी एकदम ओक्साबोक्शी रडायला लागलीस ! मी माधुकरी मागायला जातों म्हणून ? होय ?—पण आई ! तूं नाहीं कां ग लोकांचीं भांडीं घाशीत दळणं दळीत—धुणीं धुवीत ? तसेंच मी—आई गोपू उठला वाटतें, जा तूं आतां घरांत !—मी आज नको जाऊं म्हणतेस ? का बरें ? ऊन फार पडलें आहे, त्यानें माझे पाय फार पोळतील म्हणून ? असूं दे

कीं ! मी पळत पळत जाऊन लवकर परत येतों! जर आतां मी गेलों नाहीं तर गोपू , चिमी, तूं , मी सगळेजण आपण भूक लागून रडायला नाहीं का लागणार ? मग आपल्याला कोण बरें खाऊं घालील ? आई मी आत्ता जाऊन येतों, सोड मला !....”

प्रकाशन केसरी, सुधारलें, साहित्यसोपान एप्रिल १९३१.



# रावांच्या घरीं

"....खाऊ ! अरे पेढे आणले आहेत पेढे ! थांबा, थांबा ! अशी घाई करूं नका ! सगळ्याना देतों बरें मी ! आधीं देवाला नैवेद्य दाखवूं ! आणि मग—हो, हो ! तुला आधीं देईन सोने मी ! मग तर झालें !—पाणी आणलेंस ? शाबास !—हं, सोने, बापू , देवाच्या पायां पडा, आणि म्हणा ' जय देवबापा ! असेच सुखाचे दिवस आम्हांला वरचेवर दाखवीत जा ! '—अस्सें ! शाबास ! हं, हे घे सोने, तुला चार, आणि हे बापू , तुला चार. झालें ना आतां ?—कोण आहे? रामभाऊ ? अरे वा: ! तुम्ही तर अगदीं वेळेवर आलात बुवा ! हं, हे घ्या.—आधीं खा मुकाट्यानें ! मग कारण विचारा ! मला पांच रुपये प्रमोशन झालें—पगार वाढला, त्याचे हे पेढे ! समजलें ?—अरे बापू ! आतां हे आंत घेऊन जा ! आणि इकडे बघ, आपल्या त्या गोविंदरावाना, आप्पासाहेब कर्र्यांना, झालेंच तर माडीवरच्यांना, सगळयांच्या घरीं आतांच्या आतां जाऊ द्या म्हणावें ! समजलें ना ?—नको, नको, मला नको ! अहो हपिसात मीं पुष्कळ खाल्ले आहेत !—मंडळी ऐकेचनात ! तीन रुपयांचे पेढे द्यावे लागले मला !—म्हटलें जाऊं द्या ! मंडळी आपली आहेत ! आणि पुन: असे आनंदाचे प्रसंग वरचेवर थोडेच येत आहेत ?—बरें झालें चला ! इतके दिवस आशेनें रात्रंदिवस वाट पाहिल्याचें परमेश्वरानें शेवटीं सार्थक केलें ! अहो, पंधराचे वीस व्हायला सहा वर्षें लागलीं—सहा वर्षें ! नुकतेच आमचे ते दिवाकरपंत मेले, आणि त्यांची ही जागा मला मिळाली, बरें—असो, ईश्वराची कृपा होती म्हणून हे तरी दिवस दिसले ! हो ! करतां काय ! बरें आपण आतां मुंबईला कधीं

जाणार ?–रविवारींच ना ? मग हरकत नाहीं ! कारण मी परवाच्या दिवशीं श्रीसत्यनारायणाची पूजा करण्याचें योजिलें आहे ! तेव्हा म्हणतों, प्रसाद घेऊन मुंबईला जा ! ठीक आहे ! अहो, परमेश्वराची कृपा असली तर उत्तरोत्तर आपल्याला आणखीही असेच सुखाचे दिवस येतील ! काय ? म्हणतों तें खरें आहे कीं नाहीं ?...."

प्रकाशन केसरी, ४ अक्टोबर १९१३

लेखन ता. १७ मे १९१२



# ता. ७ नोव्हेंबर.

“....सावकाश–हळूंच–नीट जपून निजवा!–निश्चयानें अंग काय ताठून गेलें आहे!–आतां कोणाकडे इतका टक लावून पहात आहेस? बाबारे! जिच्या पाठीमागें आतांपर्यंत धाव धांव धांवलास. जिच्याकरतां जिवाचा असा फेंस केलास, ती तुला मिळाली कां?–आपण काय करीत आहों? कोणावर गोंवऱ्या रचीत आहों? हु: ! कल्लोळ! प्रलय! प्रलय झाला आहे!–कजाग, भांडकुदळ परिस्थिति आणि दारुण, जिवाचें रक्त पिणारी निराशा, यात पिळून पिळून निघालेलें हें चिपाड–हाय! हायरे केशवसुता! ऊठ! निजू नकोस! मेलेल्या विचारात अजून जग रुतून बसलें आहेरे! त्याला वर काढ, आणि आपल्या गोफणीनें स्वतंत्र, स्वर्गीय वातावरणांत भिरकावून दे!–विनायक, थावा हो! इतक्यांत नका हो तोंडावर गोंवरी ठेवूं!–हायरे देवा! अरे हताश होऊन बसलेल्या महाराष्ट्रा! आता तुला स्वर्गांतून स्फूर्ति आणून कोण पाजील?–तुला नखशिखांत स्वतंत्र विचारानीं जळायला कोण लावील? अरे केशवसुता! ऊठ! फुंक आपली तुतारी! प्रेतांना खडबडून जागें कर! अनंताला फोडून त्यांतून गूढें आणण्याकरिता पिटाळून लाव!–थावा! अहो जरा थावा! त्या दिव्य पुरुषाचें पुन: एकदा शेवटचें दर्शन घेऊ द्या!–अप्पा! अप्पा!! ये! अगदीं कडकडून भेट!–ऐका! काय म्हटलेंस ‘मेलेल्या गरुड पक्ष्यांबद्दल शोक करूं नका! त्यांच्याही पलीकडे तुमच्या भराऱ्या जाऊं द्या! हरहर! सूर्य मावळला! अंधार! अंधार!!–काय हा दुर्दैवी दिवस! जेव्हां जेव्हां हा दिवस उगवेल, तेव्हां तेव्हां, कैक हृदयांचा स्फोट होऊन, महाराष्ट्रांत किती तरी तेजस्वी काव्यें

तळपत राहतील !—नका ! नका हो नका ! विस्तव ठेवूं नका !' आई !! आई !. ”

* प्रकाशन, करमणूक, ८ नोव्हेंबर १९१३.
लेखन ता० ११ आक्टोबर १९१३.



---

* ही छटा प्रसिद्ध होण्यापूर्वी रा. हरीभाऊ आपटे ४।५ दिवस सारखे म्हणत होते कीं, केशवसुताची कविता जर कोठें मिळेल तर ती मी ताबडतोब आपल्या खर्चानें छापून काढीन. त्याच सुमारास केशवसुताची श्राद्धतिथी ता. ७ नोव्हेंबर ही बरोबर आहे कीं नाहीं हें विचारण्याकरता रा. सितारामपंत दामले याजकडे मी गेलो. त्यावेळीं रा. दामले यानीं आपल्या जवळील कविताचा संग्रह दाखविला. सदर्हू संग्रह रा. मोरोपंत दामले याजजवळ होता. पण ते बोरगावाच्या रेल्वेच्या अपघातात नुकतेच वारले होते. नंतर रा. सीतारामपंत नागपुरास गेले, व येताना केशवसुताच्या छापील कविता व हस्तालिखित वह्या त्यानी पुण्यास आणल्या. कविता रा. सीतारामपंत याजजवळ आहेत, ही बातमी मी ताबडतोब रा. हरीभाऊस कळविली. तेव्हा ते म्हणाले की, रा. दामले जर मला त्या छापावयास देतील, तर उद्या पाडव्याच्या मूहूर्तानें ( दिवाळींतील पाडवा ) मी त्या छापावयास सुरवात करतो. या गोष्टीस सीतारामपंतानीं संमती दिली, व संग्रह हरीभाऊंस देण्याकरता म्हणून मजजवळ दिला. पुढें दुसरे दिवसापासून नकला करण्याचें काम मी सुरू केलें. पुढें १९१७ सालीं ता. १४-८ रोजीं हरीभाऊचें बोलावणे आल्यावरून त्याजकडे गेलों, तेव्हा त्यानी माझ्या तोंडावर दोन प्रती टाकल्या! ( दिवाकर )

# एका हलवायाचें दुकान.

" ..काय कारट्यांची कटकट आहे पहा! मरत नाहींत एकदांची!–हं, काय म्हटलेंत रावसाहेब! आपल्याला पुष्कळशी साखरेचीं चित्रें पाहिजे आहेत? घ्या, आपल्याला लागतील तितकीं घ्या– छे! छे! भावामध्यें आपल्याशीं बिलकूल लबाडी होणरा नाहीं! अगदीं देवाची शपथ घेऊन सांगतों कीं, माझ्याजवळ फसवाफसवीचा असा व्यवहारच नाहीं!–अग ए! कोठें मरायला गेली आहे कोणाला ठाऊक! गप बसा रे! काय,काय म्हणालात आता आपण? हीं साखरेचीं चित्रें फार चागलीं साधलीं आहेत? अहो, आपणच काय– पण या दुकानावरून जाणारा प्रत्येकजण असेंच म्हणतो कीं, हीं साखरेची केलेलीं पाखरें–झालेंच तर हीं माणसेंसुद्धा!–अगदीं हुबेहूब साधलीं आहेत म्हणून!–काय? मी दिलेले हे पाखरावरचे रंग कदाचित् विषारी असतील? छे, हो? भलतेंच एखादें! हा घ्या. कावळयाच्या पंखाचा एक तुकडा आहे, खाऊन पहा! अहो निव्वळ साखर आहे साखर! फार कशाला? हीं सगळीं चित्रें जरी आपल्याचसारखी जिवंत होऊन नाचायला उडायला लागलीं–तरी देखील यांच्यांत असलेल्या साखरेचा कण–एक कणसुद्धा कमी होणार नाहीं! रावसाहिब, माझें कामच असें गोड आहे!—अरेच्या! काय त्रास आहे पहा! अरे पोरट्यांनो, तुम्ही गप बसता कीं नाहीं? कां या चुलींत घालून तुम्हा सगळ्यांना भाजून काढू? तुमची आई कोठें जळाली वाटतें?–काहो रावसाहेब, असे गप कां बसलांत? बोला कीं मग किती चित्रें घ्यायचें ठरलें तें!...."

लेखन ता० २३ आक्टोबर १९११.

प्रकाशन, लोकमित्र, डिसेंबर १९१३.

# अरेरे ! ओझ्याखाली बैल मेला ! धांवा !

“. . ओ !–आग लागो त्या महत्त्वाकांक्षेला ! आणि त्यांत तळमळणाऱ्या, तडफडणाऱ्या या जीविताला !–अरे हा गळफास काढा–खुंटी नरडयात शिरली ! जू दूर करा–मी मेलों !–या बैलानें, चांडाळानें छळून कि हो शेवटीं मला असें मारलें !–नको ही यातनांची तीव्र ओढाताण ! देवा सोडीव आता लवकर ! आयुष्याचा डोलारा कोसळला ! सोसाट्याच्या झंझावातांत जग गिरक्या घेऊं लागलें !–विक्राळ अंधकारानें झडप घातली ! जीवा ! जिभेचा अडसर बाजूला काढ,–पहातोस काय !–कानावर लाथ मारून, नाहीं तर डोळे फोडून बाहेर नीघ लवकर ! हा ! नरकांतल्या धडधड पेटलेल्या आगींत अनंत काल उभें राहणें पुरवलें,–पण अंगांत शक्ति नसूनही, मोहक, कामूक अशा महत्त्वाकांक्षेच्या पुरें नादीं लागून कर्र्–कर्र् ओरडून रक्त ओकणाऱ्या हाडांच्या सापळ्यावर प्रचंड ओझीं लादून, तोंडाबाहेर दुःखानी चघळून चघळून, जीवाचा फेंस काढीत, फरकटत ओढीत नेणारें, देवा ! हें जगातलें बैलाचें जिणें नको ! अरे मूर्खा, अजागळा, रोडक्या बैला ! ‘ माझ्या इतर सशक्त सोबत्याप्रमाणें मी आपल्या मानेवर मोठमोठीं ओझीं घेऊन डौलानें, गर्वानें छाती फुगवून–जगात का मिरवू नये ? ’ असें पुनः एकदा वर मान करून मला विचार पाहूं ? आ वासून रस्त्यांत धूळ चाटीत, मरणाशीं ओढाताण करीत कारे बाबा असा लोळत आहेस ?–हाय! असा हंबरडा फोडून रडूं नकोस ! माझी चूक झाली–राग मानूं नकोस ! ये, मला एकदा कडकडून शेवटची मिठी मारूं दे ! मग मी आनंदानें जाईन बरें !. . ”

प्रकाशन, लोकमित्र, डिसेंबर १९१३.
लेखन, ता. १० फेब्रुवारी १९१२.

# * वर्ड्स्वर्थचें फूलपाखरूं

“ . ओ ! स्प्लेंडिड् ! ब्यूटिफुल् ! छे ! वर्ड्स्वर्थची कविता म्हणजे काय !–मौज आहे ! फारच सुंदर, फारच उत्कृष्ट ! या महाकवीचें अंतःकरण किती प्रेमळ–अगदीं मेणासारखें आहे नाहीं? आनदामध्यें इकडून तिकडे घिरट्या घालणाऱ्या सूक्ष्म अशा किड्याला अगर मुंगीला, किंचित् कोणी अडथळा केला, तर या कवीच्या हृदयाला लागलीच चटका बसून, अश्रूंनीं डबडबलेले नेत्र त्याच्या कवितेंत ठिकठिकाणीं कसे स्पष्ट दिसतात ! हीच पहा कीं ‘ फूलपाखरूं ’ ही कविता–किती बहारीची आहे ! ही एकच काय, वर्ड्स्वर्थच्या सर्वच कविता गोड, मधूर रसानें भरलेल्या आहेत–म्हण माझी बहीण एमिलाईन आमच्या बागेंत बागडणाऱ्या फुलपाखराला–त्याच्या पंखावर बसलेली धूळ प्रेमानें हळूंच पुसावयालासुद्धा बोट लावीत नसे ! का? तर आपल्या नखाचा स्पर्श होऊन त्या बिचाऱ्याचा नाजूक पंख कदाचित् दुखावेल–आणि त्याच्या आनंदाचा विरस होईल ! अहाहा ! वर्ड्स्वर्थ कवीची सृष्टि, म्हणजे जिकडे तिकडे आनंद आहे ! धन्य

---

* हा अनुभव स्वतःचा आहे. ढेकूण चिमणींत फेकून दिल्यावर मग मनाला कसेंसेंच वाटले. रा. हरिभाऊ आपटे यास एके रात्री मी आपल्या काहीं छटा वाचून दाखवीत असता त्याची एकुलती एक कन्या तिथे जवळच ऐकत बसली होती. सदरहू छटा वाचीत असता तिला कशाची मज वाटली कुणास ठाऊक, पण ती फार आनंदानें हसली. पुढें हेंच कन्यारत्न १०।१५ दिवसात आपल्या पित्यास दुःखसागरात लोटून निजधामास गेलें. जेव्हा जेव्हा मी आनदाश्रमावरून जातों, तेव्हां तेव्हा त्या चिमुकल्या कन्येच्या गोड हास्याची आठवण होऊन मन अत्यंत उद्विग्न होतें. –दिवाकर.

तो कवि, आणि धन्य तो इंग्लंड देश! खरोखर, अशा कवीच्या अध्ययनानें खडक देखील मेण होऊन जाईल! मग माणूस तर—अरे हें काय? या पुस्तकांत हा ढेंकूण कोठून आला?—हां थांब चोरा! पळून जातोस काय? अस्सा, बरा सांपडलास! आतां जा कसा पळून जातोस तो! तरी म्हटलें सकाळीं येवढे चावत काय होतें! द्यावें याला खिडकीवाटें टाकून नाहीं?—नको नाहीं तर, तसें नको! कारण, हा पुनः घरांत येऊन चावेल! चिरडून टाकूं? इश! हाताला उगीच घाण येईल अशानें! मग?—हा हां! या दिव्यांतल्या चिमणीवाटें द्यावा आत फेंकून! म्हणजे चांगला भाजून मरेल! पहा, पहा! कसा चिकटून बसला आहे तो! पडतो आहे का खालीं?—स्स! हाय! बोट भाजलें! पड खालीं—अस्सा! मर आतां! —कोण बाबू? जेवायची तयारी झाली!—चला तर लवकर.—आपल्याला काय, जेवण झाल्यावर आणखी वर्ड्स्वर्थ वाचूं!. .. ”

प्रकाशन, केसरी.

सुधारलेला पाठ ज्ञानप्रकाश व काव्यशास्त्रविनोद ता. ३० जून १९२३



*

—ब....रे ! कांहीं नवल विशेष ?—कुशाभाऊ जोशी ? कोण बुवा हा ?—ओ ! आय् सी ! आपल्या तो. नागुअण्णाच्या....बयडीचा कुशा ? तो का बसणार आहे आमच्या परीक्षेला ?—काय ! इतका मोठा झाला आहे ! अहो परवा ना त्याला पाहिला आपण ? धड नाकसुद्धा पुसतां येत नव्हतें ! आणि तो आता कॉलेजांत का आला आहे !—काय ! दिवस कसे हा हां म्हणता जातात पहा !—हो, तेंही खरेंच आहे ! प्रकृतीमुळें जे नागुअण्णा कोल्हापुरला गेले, ते तेही तिकडेच, आणि कुशाही तिकडेच ! तेव्हां काय मध्यंतरी दिसायचें कारण ? बरें कामाशिवाय आम्ही थोडेच कुठें हलतों आहों ! आपलं पुणें, नाहीं तर मुंबई ! बाकी म्हणून ...बरें आहे येऊं आतां ? —वा, वा ! भलतेंच ! त्याची नको काळजी ! कसें झालें तरी आपल्या बयडीचा कुशा ! ! तेव्हां हें काय सांगायला हवें ? हळूच केव्हातरी बर का ?—हळूच केव्हां तरी नंबर वगैरे...."

लेखन, ता. २९ मार्च १९२८.

प्रकाशन, रत्नाकर, जुलै १९२८.



# सायकॉलॉजिकली !

" ....थांब, ये नारू !–अरे, आधीं नीट ऐकून घेतलेंस का काय काय आणायचें तें ?–हां बरोबर, पानाच्या तीन पट्टया आणि एक सिगारेट्सची पेटी !–पण ती कोणती ठाऊक आहे का ?–सीझर्स ! कैचीछाप ! भलतीसलती उगीच आणूं नकोस !–चल आटप, ठोक धूम लवकर ! सगळे आम्हीं इथें वाट पहात आहोंत !–छे बोवा ! काय तुम्हीं मघांपासून उगीच पिरपीर लावली आहेत हो ?–तुम्हां-लाच तेवढी घाई अन् आम्ही काय इथें राह्यला आलों आहोंत ? अनायासें सुट्टी मिळाली आहे, बसूं थोडा वेळ आणखी ! समजलें हो ! काम काम .काय कामाचें सागता येवढें ? येऊन जाऊन स्नान करून जेवायचें, अन् खुशाल आढ्याला पाय लावून ताणून द्यायची, हेंच कीं नाहीं ? सत्तेची येवढी बायको असल्यावर मग हो का इतकी घाई ?–असें ! हें नव्हतें मला ठाऊक ! तुमची आमची विशेष ओळखही नुकतीच झालेली ! त्यामुळें....कधींची बरें गोष्ट ही ?–म्हणजे जवळ जवळ चार वर्षें झालीं म्हणानात ?–ब .र ! फिरून कांहीं मग ?–ना ...हीं ! ! अरे, म्हणजे सांगता आहा काय तुम्ही ! खरेंच का ?–मग मोठें विलक्षण आहे बोवा ! बायको जाऊन चार वर्षें झालीं आणि अजून लग्न नाहीं म्हणतां ?–हे· स्टुपिड् !–रागावूं नका तुम्ही !–पण खरें सांगायचें म्हणजे ..साफ इथें चुकतां आहां तुम्ही ! यावरून होतें काय ठाऊक आहे का ?–अहो, बायकोवर तुमचें प्रेम नाहीं हें उघड उघड दिसतें !–भलतेंच एखादें !–असें आहे त्याचें....इतकें कशाला प्रत्यक्ष माझेंच घ्या ना ? पहिली बायको माझी मेली, तेव्हां लगेच दुसरी केली ! म्हणजे झालें काय ?–

पहिलीवर झालें माझें दुप्पट प्रेम ! पुढें दुसरी गेल्यावर तिसरी ! त्यामुळें... लक्षांत आलें कां काय झालें तें ?. पहिलीवर माझें झालें तिप्पट, दुसरीवर दुप्पट अन् तिसरीवर एकपट, म्हणजे सर्वांत कमी प्रेम तिच्यावर ! असें मोठें हें . 'सायकॉलॉजिकली'–म्हणजे मानसशास्त्रदृष्ट्या....बरें कां ?–मानसशास्त्रदृष्ट्या हें मोठें विचित्र त्रांगडें आहे ?–भले महाराज ! टॉलस्टॉय् आणि टागोर वाचून हेंच का शेवटीं सार काढलेंत ? ”

लेखन, ता. १६ मे १९२८.

प्रकाशन, रत्नाकर, जानेवारी १९२९.



# त्यांत रे काय ऐकायचंय् !

"...पेट्रोल वगैरे आहे ना रे भरपूर ?—ठीक आहे ! तबेल्यांतून आणलीस कीं निघालोंच आम्ही !—छे हो ! नाहीं जमलें बोवा आज सकाळीं फिरायला जायचं ! सगळा वेळ त्या बक्षिससमारंभांत मोडला. आठ वाजल्यापासून जें सुरू झालं, ते दहा साडे दहापर्यंत चाललं होतं आपल ! अस्सा कंटाळा आला होता कीं, ज्याचं नांव तें !—नकोसं झालं होतं अगदीं ! बरं, मधेंच उठून येईन म्हटलं, तर तिकडूनही पंचाईत ! कारण समारंभाचीं मुख्य देवता ...अध्यक्षच पडलों आम्ही, तेव्हां थोडंच कुठ हालतां येतं आहे ?—हें म्हणा रे, तें म्हणा रे, स....गळं कांहीं होईपर्यंत मग—शीः ! कसली व्यवस्था अन् काय ? ....चालल होत आपलं कसं तरी !—अहो, मुळीं हेडमास्तरानांच कुणीं विचारीना, तिथं कोण जुमानतो अध्यक्षाला अन् फध्यक्षाला ! मारे जोरजोरानं ओरडून बिचारा सागत होता कीं, 'हे पहा ! हे जे आपले आजचे सन्माननीय पाहुणे आहेत कीं नाहीं, ते या शाळेचे माजी विद्यार्थी आहेत ! फार त्यांना शाळेचा अभिमान आहे !'—झा....लं ! असं म्हणतांच, जो कांहीं टाळ्यांचा, अन् बाकावर हात-पाय आपटण्याचा धडाका सुरू झाला, तो कांहीं....राम ! राम !.... पुसूं नका ! म्हटलं आतां शाळा पडते कीं काय होतंय तरी काय ! पुढ हीच रड आमच्याही भाषणाच्या वेळीं !—अहो, कारटीं आवरतां आवरेनात ! हा उठतो आहे, तो ओरडतो आहे, गोंधळ इथून तिथून ! अन् जरा कांहीं झालं कीं नाहीं, कीं टाळ्या आणि दणदाणा हातपाय आपटायचे !—काय हें ! छे बोवा ! आपल्या वेळेला होतं कांहीं असं ?—हॅः! तऱ्हाच कांहीं वेगळी आजची ! काय पोरं,

अन् काय मास्तर! वा रे वा!!—जाऊं द्या झालं! सगळीच जिथं घाण...रॉटन् झालं आहे, तिथं काय आपण तरी—चला! आली मोटार वाटतं दाराशीं—पण हे....चिरंजीव कुणीकडे निघाले आहेत आमचे? फिरायला न्यायचं म्हणतों मी त्याला!—अप्पू, ए अप्पा! कोणीकडं निघाला आहेस? ग्राउंडांत—काय असत रे रोज उठून तिथें? चल आज बरोबर फिरायला!—पुरे रे बोवा! असेल बोलावलं मास्तरांनीं!—आहे ठाऊक किती ऐकतां तुम्ही तें!—हॅत् तेच्या! येवढंच ना? म....ग रे काय? चल ये बैस लवकर!-भिकार स्काउटिंग तें काय! अन् त्यात रे काय ऐकायचं येवढं त्यांचं!...."

लेखन, ता. २६ डिसेंबर १९२९.

प्रकाशन, रत्नाकर, जानेवारी १९३०.



# झूट आहे सब् !

"....किती ?—बारा वाजले !—हे: ! भलताच उशीर झाला आपल्याला ! वाद करायला बसलें, कीं वेळेचं भानच राहात नाहीं बोवा !—अरे असें काय ! चार कोळसे टाक आणखी बंबांत कीं आतां—हां हां म्हणतां—पाणी तापेल ! उगीच वेळ गेला झालं ! बरं, इतका काथ्याकूट करून निष्पन्न कांहींच नाहीं !—ओ हो ! काय ठिणग्या उडल्या रे या ! ती पहा ! किती उं....च उडाली आहे !—पण आ . लीच शेवटीं खालीं !—लहानपणीं विझली काय, किंवा मोठेपणीं—उंच जाऊन विझली काय, दशा शेवटीं एकच ?—म्हणजे फरक जगली किती हाच काय तो ! एकदा ठिणगी विझली....लक्षांत आल का ?....प्राणी मेला, कीं संपलं सगळं !—हो हो, सगळं संपलं !—नाहीं रे बोवा ! कांहीं पुनर्जन्म नाहीं, अन् कांहीं नाहीं !—असतं तस कांहीं, तर तुझा तो शेक्स्पीअर नसता का आला पुन्हा ? चक्क येऊन सांगितलं असतं कीं, 'हीं नाटक माझीं आहेत, मीं लिहिलेलीं आहेत ! कांहीं कुणा बेकनचा अन् फिकनचा संबंध नाहीं !' कशी छान सुंदर नाटकें ! आणि तींही कांहीं थोडींथोडकीं नाहींत, सोडील होय कोणी ? —पण पत्ताच जिथं नाहीं त्याचा, तेव्हां तो पुन्हा येतो कशाचा अन् जातो कशाचा !—हो हो, आहे ना स्वर्गांत ! जा, आणा जाऊन मग !—ठेवला आहे, स्वर्ग अन् नरक ! थोतांडं सगळीं !—अरे कुठला घेऊन बसला आहेस आत्मा !—काय, आहे तरी काय तो ?—वारा ? का प्रकाश ?—हां, वाऱ्यांमध्यें किंवा प्रकाशांत

मिसळणें, हें जर तुमचें स्वर्गा—नरकाला जाणं असेल, तर मात्र कबूल! कारण मग राजश्री! मनोविकार कुठले आले आहेत तिथं?—तें कांहीं नाहीं! तुमचा तो आत्मा कीं नाहीं, देहांत आहे तोंवरच त्याची प्रतिष्ठा!—हो मग? नाहीं कुठं म्हणतों आहें मी! देहाचंही तेंच आहे! दोघं जोंपर्यंत एकत्र तोंपर्यंत तीं एकमेक जिवंत!—मेलं कीं दोन्हीही गेलीं पार! मागमूस नाहीं कुठं मग!—तेंच तर बाबा म्हणतों आहें मी, कीं जेवढे म्हणून प्राणी जन्माला येतात, ते सगळे इथून तिथून नवीन! आणि शेवटही त्यांचा....! बरं का? शेवटही पुन्हा सगळ्यांचा एकच!—मग पाप करा, नाहीतर पुण्य करा!—स्वर्ग, नरक आणि तुझा तो पुनर्जन्म, सगळें—सब् कांहीं झूट आहे! ”

लेखन, ता. २० मे १९१२.

प्रकाशन, रत्नाकर, मे १९३०.



# यांतही नाहीं निदान-?

" ....यंदा नाहीं म्हणजे मग कायमचेंच नाहीं! कारण कांहीं जमण्यासारखें असलें, तर तें याच वर्षी. नाहीं तर....हो, तें खरें! नाहीं म्हणतों आहें कुठें मी! मार्क कमी पडले आहेत, दोनतीन विषयांत नापास झालों आहें, सर्व काहीं कबूल आहे. पण....मी तरी काय बरं करणार? गेल्या सबंध वर्षांत काण माझी ओढाताण आणि दुर्दशा झाली म्हणून सांगू!—वडलांचा तर पत्ताच नाहीं!—कुणास ठाऊक कुठे गेले आहेत ते! रात्रीं एक दिवस घरांतून नाहींसे झाले—अहो छे! कांहीं भांडण नाहीं अन् कांहीं नाहीं! दैव ओढवलें इतकेंच!—झालें! वडलांच्या शोधात कुठें आहोंत, न आहोंत तों एक दिवस सकाळीं आपली मेव्हणा गेल्याची बातमी! भोराहून इकडे पुण्याला येत होते, तों गाडीवानाला म्हणतात रस्ता नीट दिसला नाहीं, अन् जी गाडी भलतीकडे उताराला लागला, ती उपडी होऊन, पार कोणीकडच्या कोणीकडे फकली गेली! गाडीवाला काय तो कसाबसा जिवत निघाला, बाका सगळा माणसें.... माझा मेव्हणा, त्याचा एकुलता एक बरोबरीचा मुलगा, सर्व कांहीं निकाल! बहीण इकडे आजारी म्हणून हवा पालटायला आलेली, कळताच जी तिची वाचा बसली, तों अद्यापपर्यंत एक शब्द नाहीं! विचारलेंच कोणीं काहीं, तर तोंडाकडे पहाते, आणि रडू लागते घळघळां!—आहे! आई आहे घरांत! पण ती तरी काय करते बिचारी! धीर तरी तिनें कोठवर द्यायचा!—बरं, वडलांच्या आणि मेव्हण्याच्या या प्रसंगातून आम्ही कुठें हातपाय हालवतों आहोंत,

तों....महिनापंधरा दिवसांचीच गोष्ट ! काय बाबाला बुद्धि झाली कुणास ठाऊक ! बंधुराज आमचे सहज कोणाबरोबर तरी पोहायला म्हणून गेले, तेही....तिकडे कायमचेच !-घरांत मिळवता....आधार असा तोच काय तो उरलेला ! पण तोही असा....नेव्हां कशाची प्रिलिमिनरी, अन् कसला अभ्यास होतो नीट ? त्यांतूनही करायची तेवढी धडपड केली मीं ! आणि याहीपुढें....येवढें सांगतों मी आपल्याला कीं, जर मिळाला फॉर्म, तर तो....वांया नाहीं जायचा ! कारण....काय असेल तें असो ! सारखें मला आपलें वाटतें आहे येवढें खरें ! कीं सगळीकडून असें....इथें नाहीं, तिथें नाहीं, चोहों-कडूनच जर असें अपयश, तर—मी म्हणतों....देव यांतही नाहीं निदान मला........!"

प्रकाशन, रत्नाकर, आक्टोबर १९३०.



# बोलावणं आल्याशिवाय नाहीं !

" ....सांगूं तरि आता किती जणांना ? येतो तो हेंच विचारतो! —असतील ! चार नाहीं छप्पन नोटिसा निघाल्या असतील ! करायचंय काय मला त्यांच्याशीं ! जायचं असेल, त्यांनीं जावं खुशाल! मी थोडाच जातोंय तसा !—अरे राह्यलं ! नाहीं, तर नाहीं ! इथं थोडंच माझं कांहीं अडल आहे ? हपापलेलीं चार खतरुड पोरं गोळा करा, आणि हव्वं तें करा म्हणावं !—नाहीं सगळ्या गॅदरिंगच्या नाटकाचा बट्ट्याबोळ झाला, तर नांव कशाला !—अबे जारे ! मोठा शाळेचा मला अभिमान सांगतो आहे! आम्हाला तेवढा अभिमान असावा! आणि शाळेला? तिनं हवं तसं आम्हाला लाथाडावं होय? अल्बत्! नाहींच भागायचं नुसत्या नोटिशीनं ! कांहीं थोडीं थोडकीं वर्षं नाहीं काम केलेलीं मीं ! अन् तींही पुन. अशीं तशीं ?—चौथींत आल्याबरोबर धडाक्याला कॅन्यूटचं काम ! सारख्या टाळ्या ! तीच तऱ्हा दुसऱ्या वर्षी ! पुढें पांचवींत येतांच....अश्वत्थाम्याचं काम ! जो कांहीं त्यांत माझा आवाज लागला, तसा अद्याप एकाचाही कोणाचा लागला असेल तर शपथ !—दोन रे का ? पांचवींत तर ओळीनें तीन वर्षं कामं केलीं मीं ! अन् सहावींतलीं दोन ठाऊकच आहेत तुम्हाला ?— नाहीं, संभाजीचं काम तें दुसऱ्या वर्षी ! वा ! त्या वर्षी तर किती जणांनीं आत येऊन सांगितलं कीं, ' धंदेवाल्यापेक्षांही तुझं काम छान झालं !— '—अरे त्या वर्षी तर स्पेशल पदक मिळालं मला ! —तेंच पुन: सातवींत आल्यावर ! पहिलच अगदीं सीझरचं काम— दुसऱ्याला चांगलं दिलेलं....पण त्याचं काढून मुद्दाम मला दिलं !

नाटक पाह्यला कोणी युरोपीअन् आला होता, त्यानं काम पाहून.... विशेषतः ॲक्सेंट्स् ऐकून....तोंडांत बोट घातलं म्हणतात!—पुढं दुसऱ्या वर्षी?—हां बरोबर! धुंडिराजाचं काम!—तेव्हां तर काय....हंसतां हंसतां पुरेवाट झाली लोकांची! अन् सगळ्यांत बाबा कळस झाला गेल्या वर्षी!—शॉय्लॉक्चं काम!—पाहून लोक इतके चिडले कीं, एकानं तर चकचकीत धोंडा मारला स्टेजवर!—तेव्हां बोला आतां! इतका जिथं माझा अनुभव....आणि दर्जा वाढलेला, तिथं असल्या फासक्याफुसक्या नोटिशीनं जायचं?—साफ नाहीं यायचा तसा मी! मास्तरांचा जर येवढा ऐटा आहे....सांगितलं ना? मास्तराचाच जर इतका तोरा आहे, तर साफ यायचा नाहीं मी बोलावणं आल्याशिवाय.. "

लेखन ता. ३१ डिसेंबर १९२९

प्रकाशन, रत्नाकर, जानेवारी १९३१.



# मसालेदार ! ताजा चिवडा !

" मसालेदार ! ताजा चिवडा !"

हेच त्याचे नेहमींचे शब्द आणि हीच त्याची नेहमींची वेळ. संध्याकाळीं पाच साडेपांचाच्या दरम्यान असा हा रोज आमच्या घरासमोरून जात असतो. पायांत फाटकी वहाण, तीहि नेहमींच असते असें नाही ! सतरा ठिकाणीं शिवलेलें मळकट धोतर, अंगांत गुंडया तुटलेला सदरा, डोक्याला काळी मेणचट झालेली टोपी, आणि हातांत तो चिवड्याचा डबा. वय, चाळिशी उलटली असेल किंवा नसेल.

पण थांबा ! घराशेजारी आलाच तो ! ऐकलेंत ?—

" ए ! इकडे, इकडे ये ! थांब रे ! बाबा, हाक मारूं ? घ्यायचा ना चिवडा ? "

" कांहीं नको ! रोज उठून काय मेला तो घ्यायचा चिवडा ! "

" असूं दे ग ! पोर आहे ! दे रे एक दोन पैशांचा चिवडा ! "

अर्थात् हें कोण बोललें, तें सांगायला नकोच. आई, बाप, आणि एकुलतें एक सहा सात वर्षांचें मूल ! कृष्णाबाई ही सखारामपंतांची तिसरी बायको, आणि बापू हा एकच एक त्यांच्या जिवाचा आधार. बापूचे वडील हे येथील स्टेशनावर पार्सल् क्लार्क् आहेत. नोकरी बरीच वर्षें झालेली. साठ सत्तर रुपये पगार. अवांतर रोजची कांहीं वर मिळकत. सत्तेचें दोनखणी दुमजली घर ! कोणाचें एक ना दोन !

" रोज उठून मेला तो चिवडा खायचा ! आजारी पडशील ना ? शाळेंत जायला नको, कांहीं नको ! "

" नाहीं जात जा ! "

हें उत्कट चिरंजीवाचें मातुःश्रीस उत्तर ! पहा कसा दारांत ऐटींत उभा आहे तो !

[ २ ]

परवांपासून त्या माडीच्या खिडक्या बंद आहेत !

कां बरें ? सखारामपंत आजारी तर नाहींत ?—असतील. कारण साठींच्या जवळजवळ आलेले; शिवाय दम्याची व्यथा सकाळीं डॉक्टर येऊन गेले, संध्याकाळींहि येऊन गेले, आणि आतांहि—दहा वाजले. दाराशीं मोटार उभी आहेच.

थांबा, शेजारचे ते गणपतराव मोटारीपाशीं उभे आहेत. त्यांनांच जाऊन हळूच विचारूं. काहीं तरी भानगड दिसते आहे !

" सखारामपंत अत्यवस्थ आहेत ! श्वास लागला आहे "

" असें ! तरीच कृष्णाबाई सारख्या डॉक्टरकडे "

इतकें आमचें कुठें बोलणें होतें आहे तोंच —

" अरे बाप्या ! आता तुझें कसें रे होईल !! "

हे हृदयभेदक उद्गार, आणि त्यांच्याबरोबरच तो मातेचा हंबरडा !

[ ३ ]

गेले सखारामपंत !

आजचा पांचवा दिवस. बिचाऱ्या कृष्णाबाईंचा आणि आपल्या बापूचा सगळाच आधार तुटला ! त्याला काका मामा कोणी आहेत म्हणावे, तर तेहि नाहींत ! नाहीं म्हणायला एक मावशी आहे. आजच सकाळीं ती सोलापुराहून आली आहे. पण तिचा तरी काय

आधार ? कारण सोलापुरास कोणी प्रसिद्ध वकील आहेत, त्यांच्या येथें ही स्वयंपाकाला असते ! कृष्णाबाईंची ही वडील बहीण.

आणि बापू ? बापूचें तें हंसणें गेलें, दारांत उभें राहण्याची त्याची ती ऐट गेली, सगळें कांहीं गेलें ! दिवसभर दारांत उभा आहे, आणि सारखा त्या पिंपळाकडे, आणि मारुतीच्या देवळाकडे पहातो आहे !

" चिवडा ! मसालेदार ! चिवडा !

पहा ! आलाच तो रोजचा चिवडेवाला ! त्याच्या ओरडण्यांत किंवा पोषाखांत, कुठें म्हणून फरक नाहीं !

मग फरक कशांत पडला आहे ?

झपझप पावलें टाकीत तो पहा बापूच्या दारासमोर आला. आतां?—

" मसालेदार ! ताजा चिवडा ! "

असें म्हणून त्यानें किंचित् थबकल्यासारखें केलें, आणि सहज बापूकडे पाहिले, आणि उलट बापूनेंहि, त्याच्याकडे पाहिले. पण हूं कीं चूं नाहीं आणि पाहिलें तेंहि क्षणभरच ! आतां इतक्यांत देवळांतली घंटा वाजली, तेव्हां त्याची नजर तिकडेच फिरली आहे !

इकडे " मसालेदार ! मसालेदाऽऽर ! " म्हणत चिवडेवाला मुकाट्यानें निघून गेला.

—' मासिक मनोरंजन, ' एप्रिल १९२४



# कमीचा मन्या

चार वाजण्याचा सुमार असेल नुकताच मी अण्णासाहेबांकडे आलों होतों. समोरच एका उंचशा काळ्या पेटीवर कांहीं तरी ते लिहीत बसले होते. पेटीच्या अलीकडे तक्क्याला टेकून तिथेंच पडलेल्या वर्तमानपत्रांपैकीं एक घेऊन मी चाळूं लागलों.

"लबाड ! कुठें गेला होतास रे इतका वेळ ? अण्णा, हा पहा आपला मन्या आला !"

"आला ना ? आण वर, कमे ! आणि म्हणावें मास्तर आले आहेत, चहा आणा लवकर !"

"आले मास्तर ? मास्तर तुम्ही आलांत ?" असें म्हणत, आपल्या चिमुकल्या हातांनीं त्या माजराला घट्ट पोटाशीं धरून, अण्णासाहेबांची कमा—सहा किंवा सात वर्षांची असेल—धांवत–धांवत, हसत—हंसत, आपल्या वडिलाजवळ आली, आणि "हा घ्या मन्या !" असें म्हणून तिनें तें मांजर खालीं सोडलें तेंहि लागलीच त्यांच्या मांडीवर जाऊन बसलें ! आणि—

"अण्णा, तुम्ही लिहीत आहांत ना ? तें तो वांकडी मान करून वाचतो आहे पहा कसा !" हंसत, नाचत टाळ्या वाजवीत कमला म्हणाली.

"हो ना !" म्हणून त्यांनीं हंसत हंसत आपलें पत्र संपविलें, तें टिपलें, आणि पाकिटांत घालून त्यावर ते पत्ता लिहूं लागले. सहज मन्याच्या पाठीवरून त्यांनीं हात फिरविला, तों तो मोठ्या ऐटीनें मजकडे पहात गुरगुरूं लागला !

इकडे भाईनें— कमीचा हा वडील भाऊ-चहाचे दोन कप आणून पेटीजवळ ठेवले.

"चल रे खालीं जाऊ प्यायला ! मन्या, दूध हवें ना तुला ?"

भाईबरोबर कमी खालीं जाऊ लागतांच, मन्याची स्वारी अण्णा-साहेबांच्या मांडीवरून उठली आणि म्यांव म्यांव करीत तिच्यामागें खालीं गेली.

चहा घेत घेत मी म्हणालों "पांढरें स्वच्छ असून, मोठें छान मांजर आहे बुवा—कुठें मिळालें तुम्हाला हें ?"

"आमची एक जुनी मोलकरीण होती. इतकी कीं, तिनें मला-सुद्धा खेळवलें होतें ! तिनें हें आमच्या कमीकरितां खेळायला म्हणून आणलें. आलें तेव्हां अगदीं लहान होतें."

"पण मांजर मोठें छान आहे !"

— २ —

आठ पंधरा दिवस होऊन गेले. नित्याप्रमाणें फर्ग्युसन् कॉलेज्-जवळील टेकडीच्या बाजूला फिरावयाला जावयाचें म्हणून अण्णासाहेब कपडे घालण्याच्या बेतात होते.

तेव्हां सहज मीं विचारलें "आज कमी कुठें दिसली नाहीं हो?"

"सकाळपासून तिची तब्येत बरोबर नाहीं आहे."

"काय, होतें आहे काय तिला ?"

"विशेष कांहीं नाहीं, साधा हिंवताप दिसतो आहे ! पण....मला वाटतें, आज फिरायला नयेच जाऊं झालें. घरींच गप्पा मारीत बसूं. तुम्हाला कुठें जायचें नाहीं ना ?"

"छे:, तसें कांहींच नाहीं !" इतकें मी म्हणतो आहे तोंच,

अंगांतले कपडे काढून ठेऊन, अण्णासाहेब मागच्या माडींत, कमी निजली होती तिथें गेले.

अर्धा पाऊण तास होऊन गेला. काळोख अधिकाअधिक पडूं लागल्याकारणानें हातांतील पुस्तक मीं खालीं ठेवलें.

इतक्यांत अण्णासाहेब आंत आले, आणि म्हणाले, " मास्तर, कमीला ताप चढतो आहेसें वाटतें. आपले डॉक्टरांनां आणावें हें बरें. घरांत दुसरें तिसरें कोणी नाहीं आहे, तेव्हां बुधवारांतून आमच्या डॉक्टरांना घेऊन येतां? बर्फ आणायला मीं शांतारामाला पाठविलाच आहे! तुम्ही डॉक्टरांना घेऊन या!"

" ठीक आहे. मी हा निघालोंच."

जिना उतरणार तों दारांतून सहज आंत नजर फेंकली. कमीची आई लक्ष्मीबाई दिवा लावीत होत्या, आणि उशाशीं—कमीच्या उशाशीं पहातों तों तिचा मन्या!

दवाखान्यात शिरतांच डॉक्टर तिथें दिसले. क्षणाचाहि विलंब न करतां आम्ही दाघे टांगा करून घरीं आलों. येतांना " बोळांत टांगा कसा न्यायचा!" म्हणून टांगेवाल्यानें थोडीशी तक्रार केलीच.

घरांस शिरल्यावर जिन्यांतच आम्हांला " आई! आई!" असें कण्हणें ऐकूं आलें. बॅग् ठेऊन डॉक्टर कमीजवळ गेले, व तिला तपासूं लागले तिथें कमीची आई, आजी, मावशी वगैरे बसलीं असल्याकारणानें मी पुढच्या माडींत येऊन उभा राहिलों.

डॉक्टर चांगले पंधरा वीस मिनिटें तिथें होते. नंतर पुढच्या माडींत आले, आणि आपल्या बॅग्मधून स्पिरिट् लँप् वगैरे इंजेक्शन्चें सामान काढूं लागले. शांतारामानें—अण्णासाहेबांच्या धाकट्या मुलानें—पेटविलेल्या स्पिरिट् लँप्जवळ पाण्याचें भांडें आणून ठेवलें. तोंच—

" कमे ! " असा आंतून हुंदका ऐकूं आला !

खिशांतला रुमाल काढून डॉक्टर डोळे पुशीत मला म्हणतात, " इतका कसा एकाएकीं ताप वाढला हा ! एकशें सात–आठ टेंपरेचर ! आहे काय हें–"

" तासा–दोन तासांतच झालें हें ! सहाच्या सुमारास नव्हतें कांहीं भिण्यासारखें ! आम्ही तर रोजच्याप्रमाणें बाहेर फिरायला निघालों होतो ! "

एक दोन मिनिटांनीं डॉक्टर पुनः आंत कमीजवळ गेले, आणि इंजेक्शन् करूं लागले. मी दारांतच उभा राहून कमीकडे पाहूं लागलों. तिचें कण्हणें सारखें चालूच होतें. जवळच भोंवतालीं तिचे वडील, मातुःश्री, आजी वगैरे सचिंत–डोळे पुशीत–बसलीं होतीं.

आणि उशाशीं ?–तिचा तो आवडता मन्या !

मनांत म्हटलें, " मांजर असून काय एखाद्या जाणत्या माणसा-सारखा तिथें बसला आहे हा ! " मला मोठें चमत्कारिक वाटलें !

आणि कमी !

त्या दिवशींच रात्रीं ती अकराबारांच्या सुमारास सगळ्यांचे जीव होरपळून नाहींशी झाली ! खरोखर ! मुलगी किती गोड म्हणून सांगूं ! लक्ष्मीबाई तर सारख्या गहिंवरून म्हणत असतात, कीं, " कमी आपली वीज होती वीज ! क्षणभर चमकली, अन् चटका लावून नाहींशी झाली ! "

— ३ —

पुढें एक दिवस गेला,–दोन गेले–चाललें कालचक्र फिरत !

कमीला जाऊन सहा सात दिवस झाले असतील. नक्की आठवत नाहीं आतां. रोजच्याप्रमाणें मी पुढच्या माडींत पाऊल टाकणार, तों माझी नजर मागच्या माडींत गेली. तिथें काय दिसलें असेल मला?

हळूच अण्णासाहेबांना खुणावलें. ते उठून जवळ आले. आणि एक दोन मिनिटें स्तब्ध—अगदीं स्तब्ध—काय दिसत होते तें पहात आम्ही दोघे उभे राहिलों!

एक मोठा सुस्कारा सोडून परत आंत आल्यावर अण्णासाहेब मला म्हणतात "हें असें सारखें मधूनमधून चाललें आहे त्याचें!"

"असें?"

"आपला नकळत येतो आणि अशा प्रदक्षिण, घालून—इथें हुंग, तिथें हुंग करून—सारखा त्या जागेकडे टक लावून पहात बसतो! आम्ही कोणीं हाका मारल्या तर, आला तर आला, नाहीं तर नाहीं, असेंच करतो आतांशा! फारसें खाणें पिणें नाहीं. सकाळीं चहाच्या वेळेला अन् जेवायाच्या वेळेला कुठेंहि असला तरी हटकून यायचा तो! पण आतांशा तेंहि नाहीं. एक तिथें तरी बसलेला असतो, नाहीं तर समोर तिथें भिंतीवर तासन् तास बसून रहातो! ती गेल्या-पासून-तो पहा आलाच!—"

"ये! मन्या?" कंठ दाटून येऊन अण्णासाहेबांनीं त्याला जवळ बोलाविलें! पण नाहीं! कोणाकडेहि न पहातां हळूच खिडकींतून तो नाहींसा झाला!

— ४ —

याहि गोष्टीला महिना पंधरा दिवस होऊन गेले.

कांहीं कामामुळें एक दोन दिवस अण्णासाहेबांकडे बिलकुल मला फिरकायला झालें नाहीं. म्हणून दुसऱ्या दिवशीं रविवार

असल्यामुळें सकाळीं आठांच्या सुमारास मी तिकडे गेलों. वळकटीला टेकून, ब्लँकेट् पांघरून ते सचिंत पडले होते.

इकडच्या तिकडच्या गोष्टी निवल्यावर, बोलतां बोलतां सहज मी म्हटलें,—कां विचारावेंसें वाटलें कुणास ठाऊक!—पण विचारलें खरें, "अण्णासाहेब, आतांशा आपला मन्या कुठें दिसत नाहीं हो?"

"हो, बरें विचारलें! मोठें विलक्षणच आहे बोवा!"

तेव्हां मी चकित होऊन त्यांच्याकडे पहातच राहिलों!

ते म्हणाले "अगदीं पहाटेचा सुमार! मी अर्धवट झोपेंत होतों, किंवा अर्धवट जागा असेन! इतक्यांत मला मन्याचें ओरडणें ऐकूं आलें! अगदीं....चांगलें ऐकूं आलें! तेव्हां खडबडून उठलों—दोन दिवसांत मुळींच दिसला नव्हता तो!—आणि खिडकी उघडून त्याला हाकाहि मारल्या मीं, पण कुठें कांहीं दिसेना! इतक्यांत—मघाशीं-खालून आमची मोलकरीण सांगत आली, कीं, मन्याला तर कालच संध्याकाळीं गळ टाकून, बोडसाच्या विहिरींतून काढला म्हणून!"

प्रकाशन, 'मासिक मनोरंजन', जान्युआरी १९२५



# अहो ! मला वाचतां येतंय.

— १ —

नुकतीं कोंवळीं उन्हें पडलेली. थंडी पडायला कुठें सुरवात झाली असेल नसेल. तेव्हा ऊन खात खिडकींत बसलों होतों मी. आमचें घर कुठें आहे तें तुम्हांला ठाऊकच आहे ! अगदीं तिवाठ्यावरच. समोरून, म्हणजे घराच्या डाव्या बाजूनें शनवार मारुतीवरून ओंकारेश्वराकडे जाणारा रस्ता आणि त्यालाच न्यू इंग्लिशस्कूलच्या बोर्डिंगवरून दक्षिणोत्तर येऊन मिळणारा बोळ, तिथंच कोंपऱ्यावर एक लहानसें घर टाकून मी बसतों ती माडी. तेव्हां अनायासें घर चांगलें पूर्वाभिमुख आणि थडीचे दिवस, म्हणून बसलों होतों मजेत मी !

इतक्यांत पाठीमागून ओंकारेश्वराच्या रस्त्यानें ' हू-ळूप ! हू-ळूप ! करीत पांचपंचवीस मुलें धांवत आलीं. त्यांत आणखी आमच्या शेजारच्या मुलांची भर ! मग काय विचारतां ? मुलांचें तें ओरडणें आणि वानरांचें तडातड उड्या मारणें ! त्या सपाट्यांत बिचाऱ्या कौलाचा मात्र चुराडा ! दोन चार मोठीं वानरें आणि दोन लहान पिल्लें ! आमच्या कौलावरून समोरच्या छपरावर उड्या मारताना जेव्हा ती आईच्या पोटाला बिलगलीं, तेव्हा रस्त्यांतल्या मुलानीं ऐसा जयघोष केला कीं ज्याचें नाव तें !

· झालें ! हा कुठें मुलांचा आणि वानरांचा गोंधळ चालतो आहे, इतक्यात पाठीमागून सिनेमा वाजत आला ! चारपांच ब्यांडवाले आणि त्यांच्यामागें मोठमोठ्या रंगीत पाट्या असलेले दोन छकडे. तेव्हां साहजिकच वानराकडचें लक्ष उडून, मुलें तीं, सिनेमाच्या छोट्या

जाहिरातीसाठीं धांवत सुटलीं; आणि 'कालियामर्दन' 'बाळकृष्ण' हीं पाटयांवरील नांवें मोठमोठयानें ओरडत, जाहिराती वांटणाराच्या भोंवतीं त्यांनीं ही गर्दी केली! पण तिथें थोडीच दाद लागते आहे! येणारीं जाणारीं, किंवा दारांत उभी असलेलीं जीं मोठीं माणसें त्यांनाच काय तो जाहिराती मिळण्याचा हक्क! पोरासोरांना कोण विचारतो? तरी तीं " अहो, मला द्या! आम्हांला द्या!" असें मोठ-मोठयानें ओरडत त्या वाटणाऱ्यामागें लागतच होतीं! तोही " चले जाव्! " असें म्हणत, व हातांनीं खुणावीत वरचेवर त्यांना हांकून देई. वांटणारा चांगला पोक्त–मुसलमान–मनुष्य होता. मोठी दाढी ठेवलेली, डोळ्याला काळा गोल चष्मा, आणि डोक्याला मोगली तांबडी टोपी. त्यांत त्याच्या काळ्या चष्म्याचें खरोखरच भय वाटे! जीं गरीब मुलें होतीं, तीं आपलीं लांब–दूर उभीं!

पुढें ते ब्यांडवाले आणि ते छकडे निम्या वाटेवर जातात न जातात, तोंच एक लहान मुलगा–सहा सात वर्षांचा असेल किंवा नसेल–जवळच्या एका घरांतून त्या मुसलमानाजवळ धावत गेला, आणि सारखें, " अहो, पण मला द्या! मला वाचतां येतंय्! वाचून घ्या तुम्ही!" असें म्हणून, त्यानें त्या वाटणाऱ्याच्या कोटाची बाही धरली, आणि जाऊं लागला मागोमाग!

तेव्हां त्या मुसलमान गृहस्थाला काय वाटलें कुणास ठाऊक? लगेच तो थांबला, आणि, "ऐसा! तुला वाचतां येतंय्?" असें म्हणून, हंसत हसत, त्यानें त्याच्या त्या चिमकुल्या हातांत एक जाहिरात दिली, आणि " अच्छा, पढो! " म्हणून वाचायला सांगितलें! आसपासचीं माणसें पहातच होतीं हें! इकडे त्या मुलानें जाहिराती वरील 'भा-र-त-सि-ने-मा' असें एक एक अक्षर करीत त्याला

वाचून दाखविलें ! त्याबरोबर त्या वांटणारानें मुलाच्या पाठीवरून 'शाबास'! म्हणून हात फिरवला व त्याच्याकडे आणि इतर मुलांकडे हंसत हसत पाहिलें, आणि तो निघून गेला !

— २ —

यानंतर मला वाटतें, तो सिनेमाच्या जाहिराती वांटणारा महिना-पंधरा दिवसांच्या दरम्यान, दोन तीन वेळां तरी आमच्या त्यां वाटेनें येऊन गेला असेल. पण तो यायचा अवकाश, कीं तो मुलगा घरांतून धावत यायचा, आणि नेमका त्या मुसलमानाजवळ जाऊन हंसत हंसत उभा राह्यचा ! इतर कोणाला मिळो वा न मिळो, त्यांला आपली जाहिरात ही मिळायचीच ! आणि तोही ती घेऊन, नाचत उडत, चट्कन् घरांत निघून जायचा ! त्यामुळें आमच्या त्यां तेवढ्या टापूंत हा एक मोठा कौतुकाचाच विषय होऊन बसला !

— ३ —

पुढें बरेच दिवस होऊन गेले. चांगला महिना दीड महिना झाला असेल. सकाळीं नवाच्या सुमाराला मी कांहीं तरी वाचीत बसलों होतों. इतक्यांत आपला ब्यांडचा आवाज ऐकूं आला ! उठून पहातों तों नेहमींचा सिनेमावाला !

पहातांक्षणीं धसकाच बसला मला ! कां तें सांगतों आता ! तो सिनेमावाला मारुतीच्या देवळाकडे, निम्म्यां वाटेवर एका घरापाशीं गेला. आणि हातांत एक जाहिरात घेऊन तिथें थबकला. क्षणभर थांबून—अंमळ दुरूनच—दारांत डोकावून पाहूं लागला ! दोन मिनिटें झालीं, पांच झालीं, ते बाजेवाले आणि छकडे मारुतीपुढें गेले सुद्धां ! पण हा आपला तिथेंच उभा !

इतक्यांत त्या घरांतून एक मध्यम वयाचे गृहस्थ बाहेर आले—त्या वाड्याचे मालक ते,—आणि त्या मुसलमानाकडे पहात उभे राहिले क्षणभर दोघेही कांहीं बोलेनात! नंतर लवून सलाम करून तो मुसलमान त्यास म्हणतो, "रावसाब! इथें एक छोकरा—माझ्या-पासून जाहिरात घेत होता,—इथेंच तो रहात होता, तो कुठें दिसत नाहीं?"

यावर ते गृहस्थ अंमळ चकित होऊन म्हणाले, "छोकरा? कोणता बुवा?—हां हां तो होय! आमच्या वाड्यांतल्या विष्णुपंतांचा तो गोपू?"

"हां साहेब!" मध्येंच उत्सुकतेनें तो वाटणारा म्हणाला!

"हजरत! सात आठ दिवस झाले, तापानें वारला तो!"

हे शब्द कानीं पडतांच तो बिचारा मुसलमान गृहस्थ जागच्या जागीं स्तब्ध—अगदीं स्तब्ध उभा राहिला!

पण असा किती वेळ उभा राहणार?

"ऐसा! खुदाकी मर्जी बाबा!" असें म्हणून व एक लांब सुस्कारा सोडून, त्यानें हातांतली जाहिरात हळूच दारांत टाकली, आणि जड पावलें टाकीत तो निघून गेला!

— ४ —

पुढें आश्चर्य हें कीं, जेव्हां जेव्हां तो आमच्या बाजूला येतो, तेव्हां तेव्हां त्या दारापाशीं जातो, आणि लवून, हळूच एक जाहिरात आंत टाकतो, व मुकाट्यानें आपला निघून जातो.!

प्रकाशन, 'रत्नाकर', नमुना अंक, आक्टोबर १९२५.
लेखन, ता. ३० मार्च १९२४.



वाचून दाखविलें ! त्याबरोबर त्या वांटणारानें मुलाच्या पाठीवरून 'शाबास' ! म्हणून हात फिरवला व त्याच्याकडे आणि इतर मुलांकडे हंसत हसत पाहिलें, आणि तो निघून गेला !

— २ —

यानंतर मला वाटतें, तो सिनेमाच्या जाहिराती वांटणारा महिना-पंधरा दिवसांच्या दरम्यान, दोन तीन वेळां तरी आमच्या त्यां वाटेनें येऊन गेला असेल. पण तो यायचा अवकाश, कीं तो मुलगा घरांतून धावत यायचा, आणि नेमका त्या मुसलमानाजवळ जाऊन हंसत हंसत उभा राह्यचा ! इतर कोणाला मिळो वा न मिळो, त्यांला आपली जाहिरात ही मिळायचीच ! आणि तोही ती घेऊन, नाचत उडत, चट्कन् घरांत निघून जायचा ! त्यामुळें आमच्या त्यां तेवढ्या टापूंत हा एक मोठा कौतुकाचाच विषय होऊन बसला !

— ३ —

पुढें बरेच दिवस होऊन गेले. चांगला महिना दीड महिना झाला असेल. सकाळीं नवाच्या सुमाराला मी कांहीं तरी वाचीत बसलों होतों. इतक्यांत आपला ब्यांडचा आवाज ऐकूं आला ! उठून पहातों तों नेहमींचा सिनेमावाला !

पहातांक्षणीं धसकाच बसला मला ! कां तें सांगतों आता ! तो सिनेमावाला मारुतीच्या देवळाकडे, निम्यां वाटेवर एका घरापाशीं गेला. आणि हातांत एक जाहिरात घेऊन तिथें थबकला. क्षणभर थांबून—अंमळ दुरूनच—दारांत डोकावून पाहूं लागला ! दोन मिनिटें झालीं, पांच झालीं, ते बाजेवाले आणि छकडे मारुतीपुढें गेले सुद्धां ! पण हा आपला तिथेंच उभा !

इतक्यांत त्या घरांतून एक मध्यम वयाचे गृहस्थ बाहेर आले— त्या वाड्याचे मालक ते,—आणि त्या मुसलमानाकडे पहात उभे राहिले क्षणभर दोघेही कांहीं बोलेनात! नंतर लवून सलाम करून तो मुसलमान त्यास म्हणतो, "रावसाब! इथें एक छोकरा—माझ्या-पासून जाहिरात घेत होता,—इथेंच तो रहात होता, तो कुठें दिसत नाहीं?"

यावर ते गृहस्थ अंमळ चकित होऊन म्हणाले, "छोकरा? कोणता बुवा?—हा हां तो होय! आमच्या वाड्यांतल्या विष्णुपंतांचा तो गोपू?"

"हां साहेब!" मध्येंच उत्सुकतेनें तो वाटणारा म्हणाला!

"हजरत! सात आठ दिवस झाले, तापानें वारला तो!"

हे शब्द कानीं पडतांच तो बिचारा मुसलमान गृहस्थ जागच्या जागीं स्तब्ध—अगदीं स्तब्ध उभा राहिला!

पण असा किती वेळ उभा राहणार?

"ऐसा! खुदाकी मर्जी बाबा!" असें म्हणून व एक लांब सुस्कारा सोडून, त्यानें हातांतली जाहिरात हळूच दारांत टाकली, आणि जड पावलें टाकीत तो निघून गेला!

— ४ —

पुढें आश्चर्य हें कीं, जेव्हां जेव्हां तो आमच्या बाजूला येतो, तेव्हां तेव्हां त्या दारापाशीं जातो, आणि लवून, हळूच एक जाहिरात आंत टाकतो, व मुकाट्यानें आपला निघून जातो.!

प्रकाशन, 'रत्नाकर', नमुना अंक, आक्टोबर १९२५.
लेखन, ता. ३० मार्च १९२४.



# पोराचा नाद झालं !

हो, तिथंच. शनवारांत नातूच्या हौदाजवळ जो दुमजली निळा वाडा आहे, तिथंच मी म्हणतों ते नीलकंठराव राहात असतात. वयानें साठीच्या आंत बाहेर असतील नसतील. मनुष्य खाऊन पिऊन तसा सुखी आहे. पण बरोबरीचे स्नेहीसोबती म्हणावेत, तर ते कांहीं फारसे कोणी दिसत नाहींत; त्यामुळें शाळेंतले काम संपलें कीं, आपलें घर बरें, आणि आपण बरे, ही त्यांची नेहमींची वृत्ति.

गेल्या रविवारचीच गोष्ट. दर रविवारीं सकाळीं आठ ते नऊच्या दरम्यान चहाला मी तिथं हजर असायचें हें आमचें ठरलेलें. म्हणून दिवाणखान्यांत जाऊन, नेहमींप्रमाणें कोटटोपी काढून ठेवली आणि गालिच्यावर 'ज्ञानप्रकाश'चा अंक पडला होता, तो घेतला आणि वाचूं लागलों. जवळच नीलकंठराव लहानसें पोथीसारखें कांहीं तरी वाचीत होते आणि तेंही अगदीं मनापासून ! तेव्हां दोन तीन मिनिटें तरी 'या, बसा' पलीकडे काहींच आमचें बोलणें झालें नाहीं.

"कां तुमचे बापूसाहेब नाहीं आले वाटतें ?" असें हसत हंसत, आणि पुस्तक मिटवीत त्यांनीं मला विचारलें.

मीं म्हटलें, " नसतील आले. ते आपल्या संस्थेचे तहाहयात सभासद झाले आहेत, तेव्हा आता सारखीं कामें. आताच साडे-आठाच्या सुमाराला—त्यांच्या कार्यकारीमंडळाची, मला वाटतें, बैठक आहे !"

इतकें मी बोलतों आहें, तोंच माझी नजर नीलकंठरावांच्या चष्म्याकडे गेली, आणि पहातों, तों त्यांचा नेहमींचा चष्मा नाहीं !

म्हणून सहज विचारलें, " कां हो दुसराच चष्मा दिसतो आहे आज !"

" हो !" असें म्हणून किंचित् ते हंसले, आणि. ..चष्मा हातांत घेऊन, खिन्न स्वरानें. ..क्षणभरानें मला म्हणतात, " पोराचा नाद झालं !"

" म्हणजे ? मी नाहीं समजलों !"

— २ —

खुर्चीवर बसले होते ते उठले, आणि जड पावलांनीं मी बसलों होतों तिथंच शेजारीं आले, आणि " अरे रामा रे !" असें म्हणून, एक मोठा सुस्कारा टाकून खालीं बसले !

समोरच भिंतीवरील एका मोठ्या तसबिरीकडे बोट करून मला विचारतात, " तो फोटो....कुणाचा आहे, तें तुम्हांला ठाऊकच असेल ? "

" हो," मी म्हटलें, " तुमच्या चिरंजीवांचा !"

यावर ते म्हणतात कीं, " हाच आमचा बाळू, आठ एक वर्षांचा असेल, त्या वेळेच्या या गोष्टी. तेव्हां माझी मिळकत म्हणजे, शाळें-तला पगार, आणि शिकवण्यांचे वगैरे धरून, तीसचाळीस म्हणजे शिकस्त ! आपला कसाबसा संसार—"

" ही कुठली वांईची, कीं नगरची हकीकत ?" मध्येंच विचारलें मीं.

तेव्हां ते म्हणाले, " नाहीं, त्या वेळेला पुण्यास होतों मी.... असो ! एक दिवस, काय वाटलें त्याला कुणास ठाऊक,....सका-ळची वेळ, नेहमींप्रमाणें गीतेंतला पाठ वाचून—"

" ती टेबलावर दिसते आहे तीच का ?"

" हो, तीच ती पोथी !....वाचून झाल्यावर जेवायला म्हणून जों उठणार इतक्यांत तो माझ्याकडे पहात म्हणतो,....' दादा ! तुम्ही हा '—हा म्हणजे जस्ताचा—' चष्मा कां हो लावतां ? सोन्याचा कां नाहीं लावीत ?'....कधीं कोणाचा सोन्याचा पाहिला असेल त्यानें, तेव्हां विचारलें आपलें !"

" अस्सें ! मग ?"

" मग मींही हंसत हंसत म्हटलें कीं, ' .काय करावें बोवा, मी पडलों गरीब ! सोन्याच्या चष्म्याला पैसे फार पडतात ! आणायचे कुठले ? आता....आतां तूंच मिळवून आणशील, तेव्हां.... घालीन बापडा सोन्याचा !"

असें बोलतांच त्यांचे डोळे....काय पण भरून आले !!

— ३ —

" झालें !" डोळे पुसून पुढें ते सांगू लागले, " तें तिथें तितकेंच राहिलें ! पुढें. ..मला वाटतें, तो इंग्रजी दुसरींत किंवा तिसरींत असेल. एके दिवशीं कुठलेसे संस्थानिक किंवा दुसरे कोणी तरी—हा ज्या शाळेंत होता, ती शाळा पाह्यला म्हणून आले. हा वर्ग पहा, तो पहा, असें करतां करता याच्या वर्गांत ते आले. आणि विचारलें वाटतें कीं, ' पुस्तकांतल्या कवितांखेरीज बाहेरचें कांहीं कुणाला म्हणतां येतें का ?' तेव्हां कोणीं कांहीं फारसें वाटतें म्हटलें नाहीं. याच्यावर जेव्हां पाळी आली, तों लागली स्वारी ' केकां 'तले श्लोक म्हणायला ! पांच झाले, दहा झाले याचा आपला चालला सपाटा !"

" अरे वा ! फारच छान ! " असें रहावेना म्हणून म्हटलें मीं !

" अहो, छान कसलें ! पूजा, रामरक्षा किंवा असे कांहीं ' केका 'तले श्लोक....बसल्या बसल्या सहज शिकवलेले मीं. झाला त्यांचा उपयोग ! "

" मग पुढें ? "

" सगळें....आहे तें पुढेंच आहे ! त्याचें तें म्हणणें ऐकलें. आणि ते बुवाजी अगदीं खूष झाले ! नांव वगैरे विचारलें, अन् लगेच खिशांतून दहा रुपयांची नोट काढून, बक्षीस म्हणून त्याच्या हातावर ठेवली, आणि पाठीवर हात फिरवून शाबासकी दिली ! ! "

— ४ —

" पुढें दुसऱ्याच दिवशीं पूजा वगैरे आटपली. आणि आतां गीता वाचायला बसणार, इतक्यांत डबीचें झाकण उघडून पाहातों तों आपला निराळाच चष्मा ! तेव्हां हा आला कुठून ! म्हणून जों विचार करतों आहे—

तोंच त्याची आई हंसत हंसत म्हणाली, ' का, येवढा विचार कसला चालला आहे ? '

मीं विचारलें, ' हा चष्मा कोणाचा ? '

तेव्हां ती अधिकच हंसून म्हणाली, "कोणाचा म्हणजे ? आपलाच नव्हे कां तो ?"

' छे ग ! माझा कुठला असेल हा !' असें किंचित् त्रासून म्हटलें मी !

'बरें तर, बाळूलाच विचारावें मग !' म्हणून तिनें त्याला हांक मारली, आणि हंसत हंसत विचारलें कीं, 'अरे, हा चष्मा कोणाचा?'

पण तोही कांहीं बोलेना ! गालांतल्या गालांत हंसत, आपला मुकाट्यानं खालीं पहात स्वस्थ उभा.

तेव्हां त्याची आईच कौतुकानें म्हणाली, ' ही. .आपल्या बाळूची मिळकत बरं ! काल त्याच्या शाळेंत कोणसस आल होतं. अन् श्लोक चांगले म्हटल्यावरून दहा रुपये याला त्यांनीं बक्षिशी दिली ! त्यांतला हा....'

' खरे का रे ! मग काल कुठं बोलला नाहींस तें ?'

' पण आतांपर्यंत इकडे कळवायचंच नाहीं, असंच जर ठर-लेलं ! शाळेंतून पैसे मजजवळ दिले, आणि मनांतलं सगळ सांगितलं त्यानं आपल्या ! सकाळीं आज लगोलग गेला, आणि हा आणला चष्मा....सोन्याचा करून !' "

— ५ —

हें सांगतां सागता त्याचा कठ किती दाटून आला म्हणून सांगूं ! क्षणभर स्वस्थ....अगदीं स्वस्थ नीलकंठराव पडून राहिले.

" तेव्हा.. .अशी ही हकीकत !" म्हणून पुनः ते सावकाश बोलूं लागले, " बाळू....आमचा तसा चांगला मुलगा ! अभ्यासांत जरी हुशारांतला नव्हता, तरी होता आपला बेताचा ! पण स्वभा-वानं....खरोखरच चांगला ! पण नशीबापुढें....योडेंच चालतें आहे आपलें ? नव्हता आम्हांला फार दिवस लाभायचा तो—वयाच्या सोळाव्याच वर्षी. . !"

" कशानं इतकं विकोपाला गेलं ?"

" कशानं ! कांहीं कुणाला नीट समजलं नाहीं ! पोटांत काय-ससं झालेलं ! पुष्कळ डाक्टर झाले, आणि इलाज केले, पण नव्हतं

झालं चला ! एकुलता एक मुलगा ! गेल्याची आठवण झाली; अन् जीव घाबरा होऊन तडफडायला लागला, म्हणजे हा चष्मा लावतों, आणि बसतों ती गीता वाचीत ! तेव्हां असा हा—" नीलकंठराव गहिंवरून म्हणाले, " अस्सा हा पोराचा नाद !!"

प्रकाशन, 'रत्नाकर', नोव्हेंबर १९२६.

लेखन, ९ मे १९२६.



# दिवा मोठा कसा झाला !

थंडीचे दिवस. आठ वाजले असतील नसतील. खोलींतील सामानसुमान झटकून कांहीं तरी वाचायला म्हणून बसलों मी. इतक्यांत खिडकीखाली रस्त्यांत एक मोटार येऊन थबकली.

" माझ्याकडे........अन् मोटारींतून कोण बुवा ! " असें म्हणून खिडकींतून जों डोकावतों आहें, तोंच मोटारीचें दार उघडून काळा कोट घातलेले लठ्ठसे एक गृहस्थ बाहेर पडले. पाहतों तो आमचे मित्र सरदार नानासाहेब !

" कोण नानासाहेब ? तुम्ही....आणि मोटारींतून ? काय आहे काय विचार ! "

" थाब, वर येतों, आणि सांगतों तुला काय विचार आहे तो !"

वास्तविक दोघेही आम्ही भिन्न परिस्थितींतले. पण लहानपणापासून जन्म सगळा एकाच आळींत गेलेला, आणि शिकलों तेंही एकाच शाळेंत. तेव्हां बोलण्याचालण्यांत अरे काय, अन् अहो काय सारखेंच.

" काय ? वाचीत बसला आहेस ना ! राम ! राम ! पुस्तकांतला किडा तूं, पुस्तकांतच मरायचास ! ,,

असें म्हणून स्वारी समोरच आमच्या येऊन बसली. हातांत त्यांची अर्धांगी, म्हणजे सिगारेट होती हें सांगायला नकोच.

" अरे नानासाहेब, काय हें सिगारेट्स् ओढणं ! जरा तरी अमळ........" असें मीं म्हटलें मात्र, तोंच ते उसळून म्हणाले, " तुला त्यांतलें काय समजतं आहे ! कधीं ओढायची नाहीं, सवयायची नाहीं ! काय तुला त्यांतली लज्जत ठाऊक ! "

" सगळ खरं ! पण कांहीं तरी........"

" आतां एक अक्षर तर बोल, कीं पेटींतलं हें जुडगंच्या जुडगं तुझ्या तोंडांत कोंबतों, अन् सगळ्या एकदम तुला ओढायला लावतों कीं नाहीं बघ ! "

मीं मोठ्यानें हंसत म्हटलें, " हा मात्र कठीण प्रसग ! "

" कठीण म्हणजे ! गांठ कुणाशीं आहे ! तूं लेका हा....असाच ! बर, आतां काय सांगतों तें नीट ऐकून घे ! आज रात्रीं माझ्याकडे गाण्याला, आणि बरोबर बाराला उद्या जेवायला..... .."

" जरूर ! जेवायला अगदीं जरूर येतों मी. "

" नुसतं जेवायला नाहीं....गाण्याला आधीं आलं पाहिजे ! जागरणाबिगरणाची कांहीं एक सबब चालायची नाहीं ! येऊ तर नकोस, कीं सडकीत तुला इथून नेतों कीं नाहीं बघ ! "

" अरे पण भाई, हें सगळं कशाकरितां ? "

" कांहीं कारण नाहीं, अन् कांहीं नाहीं ! लहर, बस्स ! आलं मनांत, ठरवलं झाल ! उठल्याबरोबर सकाळींच त्र्यंबकरावाकडे गेलों अन् त्याचीच मोटार घेऊन निघालों आहें हा असा...."

" तरीच ! नाहीं तर म्हटलं....नानासाहेब ! आणि त्यांनीं मोटार इतक्यांत कशी घेतली ? "

" अरे घेईन ! वेळ आली म्हणजे मीही घेईन ! घेतल्याशिवाय सोडतों होय ! बहुतेक पुढच्याच खेपेला मुंबईला गेलों म्हणजे...."

" हो ! बरी आठवण झाली ! " मधेंच थांबवून त्यांना म्हटलें, " आल्याबरोबरच विचारणार होतों कीं....परवां जे मुंबईला गेलां होतात त्याचं काय झालं ? "

" व्हायचं काय?" नानासाहेब सिगारेट्ची राख झाडीत म्हणाले " व्हायचं तेंच झालं!"

मी विचारलें, " पण तेंच काय तें सांगाल तर खरं!"

" सागायचें म्हणजे इतकेंच, कीं शहाण्यानें या त्रिंबकच्या भानगडींत पुन्हां पडूं नये!"

" कां? पुन्हां फिसकटलं वाटतं?"

" जन्माचेच रडे तुम्ही! तो आणि तू एकाच माळेतले! स्वतः काहीं हातपाय हलवायचे नाहींत; बरें, चार मित्रमंडळींनीं, आणि घरच्या माणसांनीं थोडीफार उचल खावी, तर तुम्हीच आयत्या वेळीं..."

क्षणभरानें मी म्हटलें, " माझं एक असो म्हणा, पण त्रिंबकरावानं असं का करावं तें समजत नाहीं! हें.. असं तिसऱ्यांदा झाळं!"

" अरे, या वेळेला तर अगदीं नक्की व्हायला आलेलं. स्वतः आमच्याबरोबर चांगला आला. मुलगी पाहाली. ती त्याला पसंतही पडली. इतकंच नाहीं, तर तिथं लग्नाचा रुकारही दिला त्यान!"

" आणि मग?"

" मग काय? घरीं परत आल्यावर 'नको बुवा!' म्हणून बसला हातपाय गाळून!" तेव्हा दोन तीन मिनिटं कशाकडे तरी पहात दोघेही आम्ही स्वस्थ बसलों.

मी म्हटलें, " मोठें विलक्षण आहे बुवा! इतकी सगळी अनुकूलता असून....हें अस कां करतो कांहीं कळत नाहीं!"

" बैस त्याचा तूं आतां विचार करीत! मला नाहीं वेळ, सर्वांकडे अजून जायचें आहे मला!" असें म्हणून झट्कन ते निघून गेले!

" काय आहे कोणास कळे !" असें जों मी मनांत पुटपुटतों आहें, तोंच ' गुडगुड ' करीत खिडकीवाटे एक भुगा आंत शिरला. तेव्हां त्याच्याचकडे माझें लक्ष. कितीतरी वेळ त्याचें तें गुणगुणणें, आणि इकडे माझ्याही डोक्यांत ' हें असें का ? हें असं का ? ' असें.....

— २ —

पुढें दोन चार दिवसांनीं दिवे लागण्याच्या वेळीं त्रिंबकरावांकडे गेलों मी. ते घरांत नव्हते, म्हणून तसाच तडक माडीवर दत्तोपंतांकडे गेलों. दत्तोपंत हे त्रिंबकरावांचे धाकटे बंधु. मुंबईच्या मेडिकल कॉलेजमध्यें त्यांचें दुसरें वर्ष चालूं होतें. पण त्यांचें वय आणि अभ्यास यांच्या कितीतरी पलीकडे त्यांचें मन गेलें होतें ! पांचसहा वर्षांनीं माझ्यापेक्षा ते लहान. असें असून त्रिंबकरावांशीं फारसें न बोलतां, मी आपला आधीं दत्तोपंतांकडेच धांवे !

" यावं !" अंथरुणावर पडल्या पडल्याच हंसत हंसत माझ्याकडे पहात दत्तोपंत म्हणतात, " अहो, काय तुमची किती वाट पहावी हो ! म्हटलं आज याल उद्यां याल...."

" पण तुम्ही इथं आला असाल, याची मला कल्पनाच जर नाहीं...."

" काय, कल्पना काय नाहीं ! त्रिंबकरावांच्या बरोबरच आलों मी !"

" आणि परीक्षेचें ?"

" अहो, कसली परीक्षा अन् काय !" दत्तोपंत म्हणाले, " प्रकृति संभाळून जें होईल तें होईल !"

इतक्यांत नोकरानें आंत येऊन टेबलावरील दिवा लावला आणि तांब्याभाडें वगैरे घेऊन जाऊं लागला. तोंच दत्तोपंतानें, “ दिवा अमळ बारीकच ठेव, आणि खालीं जाऊन ताईंना म्हणावें, वर दोन कप चांगला कोको पाठवून द्या.” असें त्याला सांगितलें.

“ अहो, काय दत्तोपंत हें ? माफ करा बुवा ! कोको वगैरे घेण्याची वेळ का आहे ही ?”

“ अहो, कसची वेळ अन् काय ! आणि....कोको बरा लागतो म्हणून थोडाच ध्यायचा आहे ! आनंदमय खरा प्राण आहे ! काय ? ”

“ खरं आहे !” हंसत हंसत मीं म्हटलें, “ बरं, पण दत्तोपंत, औषध वगैरे चालूच आहे ना ? ”

तेव्हां ते म्हणाले, “ आहे. सगळें ठीक आहे. पण खरं सांगूं तुम्हांला ? ...इथल्या गोष्टींवरून माझें मनच उडत चाललं आहे. आताशा असं एकटं दुकटं बसावें, आणि....कांहीं तरी वेगळ्याच गोष्टींचा विचार करावासा वाटतो....हो बरं झालं....काय म्हणत होतो मी ? ?....हां बरोबर तुमच्याकरतां म्हणून, आम्ही एक चीज आणली आहे मुंबईहून ! ओळखा कोणती ती ? ”

मी म्हटलें, ” एखादी छानदारशी काठी असेल बहुधा ? ”

“ अहो काठी ! ती तर आणलीच आहे. पण दुसरं काय तें बोला ? ”

“ नाहीं बोवा, आपली अगदी शरणचिठी आहे ! ”

तेव्हां ते म्हणाले “ अहो मला कशाला ! प्रत्यक्ष त्या वस्तूलाच आतां शरण जायला लावतो ! ....अरे रघुवीर ! ....खालीं रघुवीर आहे का ? असला तर या बरं वर लावून ? ”

" बरं, अलीकडे अवांतर वाचन वगैरे कांहीं ? " सहज आपलें विचारलं मीं, " टॉल्स्टॉय्च्या गोष्टी झाल्याच असतील वाचून ? "

तेव्हां हंसत हंसत ते म्हणाले, " हां, चाललाय येत आतां आमच्या गोष्टीजवळ ! बरं, अजून तरी ओळखा ! "

तों मीं अधिकच बुचकळ्यांत पडलों ! म्हटलें, "एखादें पुस्तक-बिस्तक आणलें आहे कीं काय टॉल्स्टॉय्चें ! "

तेव्हां अधिकच हंसून आलेल्या रघुवीरकडे वळून दत्तोपंत म्हणतात, " अरे रघुवीर, पलीकडच्या त्या दिवाणखान्यांत त्रिंबक-रावाच्या ट्रंकेंत कागदाचें एक भेंडोळं आहे, तें तेवढं आण बरं ! "

शेवटला ' बरं ' ! शब्द उच्चारतांना दत्तोपंतांची मुद्रा, विशेषतः डोळे खरोखरच पहाण्यासारखे होते !

रघुवीर कागदाचें तें भेंडोळें हातात घेऊन आंत आला, आणि तें आपल्या चुलत्याच्या हातांत देणार, तोंच ते म्हणाले, "दे, त्यांच्याच हातात दे तें ! पहातील ते आंत काय आहे तें ! "

भेंडोळें उलगडून पहातों तो टॉल्स्टॉय्चा एक छानदारसा फोटो ! घरादाराला अजिबात फाटा दिलेला डोक्याला काहीं नाहीं, आणि चालली आहे स्वारी अनवाणी भटकत ! सगळी संपत्ति काय तें खिशातलें बायबल् ! हा एकंदरींत टॉल्स्टॉय्साहेबांचा थाट !

मीं म्हटलें " फोटो खरोखरच चागला आहे. मला हवा होता तस्सा आहे. तेव्हां आभार काय, जितके मानावेत तितके थोडेच आहेत ! "

" आमच्या रघुवीरालाही तो फार आवडला ! रघुवीर, जाऊन आलास का देवाला ? " दत्तोपंतांनीं आपल्या पुतण्याला विचारलें.

" नाहीं अजून. आतां जायचं आहे." असें रघुवीरनें उत्तर दिलें, आणि तो जायला निघाला.

" बरें, जातांना कोणाला तरी घेऊन जा हं."

" हो ! " असें म्हणून तो निघून गेला.

दारांत काळोख होता. एक दोन मिनिटें तरी दत्तोपंत तिकडे पहातच राहिले. तेव्हां कोणतें गोड चित्र त्यांच्या डोळ्यापुढें खेळत होतें ? "

मीं विचारलें, " रोज हा देवाला जातो का ? "

" हो, दुसरें काय होईल तें चुकेल, पण देवदर्शन त्याचें कधीं टळायचें नाहीं ! "

" कोणत्या देवाला जातो रोज ? "

" तुळशीबागेतल्या रामाला. त्याची आई होती, तोंपर्यंत तिचा रोजचा क्रम असे. आणि बरोबर यालाही ती नेत असे ! खरोखर, मुलगा तसा मोठा....आम्ही सगळेजण थोडेफार भिऊनच असतों त्याला ! "

" असें ? "

" कल्पना नाहीं तुम्हांला ! पोर मोठं मातृभक्त आहे ! आई गेली तेव्हां हा काय सहा-सात वर्षांचा असेल, पण.... "

किंचित् डोकावून ते कानोसा घेत दाराकडे पाहूं लागले.

तेव्हां मीं हळूच म्हटलें, " कोणी नाहीं तिथं, सांगा खुशाल. "

" याची आई गेली, अन् दुसऱ्या दिवसापासून हा आपला.... आजारी पडायच्या आधीं ती जी चंद्रकळा नेसली होती, तिचीच घडी उशाला घेऊन हा आपला रोज निजायला लागला ! "

तेव्हां क्षणभर आम्ही एकमेकांकडे पहातच राहिलों !

दत्तोपंत डोळे पुसून म्हणतात, "रोजचा त्याचा हा क्रम आहे! स्नान केल्यावर ती चंद्रकळा पाण्यात बुचकळून, ती पिळून काढतो, आणि....स्वतः ती वाळत घालतो. दुसऱ्या कोणाला हात लावूं देत नाहीं!"

"असं रोजचं आहे हें?" आश्चर्यानें थक्क होऊन म्हटलें मीं!

"अगदीं रोजच आहे! आईचं लुगडं स्वतः धुवायचं, अन् त्याचीच घडी उशाला घेऊन झोंपीं जायचं!"

"त्याचे वडील त्रिंबकराव याबद्दल कधीं कांहीं बोलत नाहींत?"

"ते काय बोलणार! उलट मला वाटतं....बोलूं नका कोणाजवळ तुम्ही. आपल्या मुलाचें हें....चांगल अभंग रहावं, चांगली त्याची जपणूक व्हावी, म्हणूनच स्वतः....दुसरं लग्न करीत नाहींत!"

पांचदहा मिनिटें तक्क्याला टेंकून दोघेही आम्ही स्वस्थ–अगदीं स्वस्थ पडून राहिलों. घड्याळाची टकटक कशी स्पष्ट ऐकूं येत होती! खोलींतील सामानसुमानावर चक्क प्रकाश पडला होता.

दिव्याकडे पहात दत्तोपंत म्हणतात, "दिवा इतका मोठा कोणीं केला हो!"

मीं म्हटलें, "नाहीं बोवा, आपण तर इथंच बसलेलों, अन् रघुवीरही तसाच गेला!"

"मग एकाएकीं इतका मोठा कसा झाला!!"

लेखन, ता. ५ मे १९२७.

प्रकाशन, 'रत्नाकर', ऑगस्ट १९२७.



# आले कुठून....गेले कुठें ?

नाटक संपायला जवळ जवळ तीन वाजले. गर्दी तर कांहीं पुसूंच नका. धक्काबुक्की करीत मार्ग काढणें माझ्यासारख्याला थोडेंच जमतें आहे ! तेव्हां किर्लोस्कर नाटकगृहाच्या आंतल्या बजूला माझी चांगलीं पंधरावीस मिनिटें तरी मोडलीं असतील. शिवाय कांहीं केल्या पायच लवकर माझे निघेनात तिथून !

बाहेर पडलों, आणि नानावाड्याला वळसा घालून बिनीवाल्यांच्यां वाड्यापाशीं आलों. सावकाश मजेंत चाललों होतों. वेळ रात्रीची. वाराही छान सुटलेला, आणि चांदणें तर असं कांहीं बहारीचें पडलें होतें कीं, वा रे वा: !

"खरंच ? नाटक किती झकास झालं नाहीं ?" असें म्हणून चार पावलें पुढें असलेले गृहस्थ थांबले आणि चालूं लागले मजबरो-बर. साधा पोषाख, मध्यम उंचीचे, जवळजवळ माझ्याच वयाचे होते म्हणायचे.

मी म्हटलें, "वा ! हें काय बोलणं ! अहो नाटक तर झालंच चांगलं, आणि गाणं ?" यावर लगेंच ते म्हणतात, "तें तर कांहीं पुसूच नका ! किती मन लावून, आणि काय जीव तोडून गाणं हो हें !"

"खरं आहे," मी म्हणालों, "असं क्वचित् ऐकायला सांपडतं !"

"पुन्हा आश्चर्य हें कीं, नाटक हें इतक्या वेळा होऊन गेलं आहे ना ? पण गर्दी कांहीं कमीं नाहीं ! 'स्वयंवर' म्हटलं, कीं लहान मोठे जीव कसे भराभरा गोळा होतात ! मग काय इतकी यांत जादू...."

मी म्हणालों, "नाटकांत म्हणण्यापेक्षां त्यांतल्या गाण्यांत म्हणा हवी तर! अहो, त्याचसुद्धा वेड कांहीं कमी नसतं! एकदां का तें जडलं, कीं मग जिवंतपणींच काय, मनुष्य मेल्यावर सुद्धा...."

हें ऐकतांच तो गृहस्थ काय पण दचकला!

"का? कां बरें दचकला?"

लगेच तो हंसून म्हणतो, "बरोबर आहे! म्हणतां तें अगदीं खरं आहे. माझंच उदाहरण घ्या कीं..."

इतकें होतें आहे, तों फुटक्या बुरुजावरून शनवार मारुतीकडे जाणाऱ्या रस्त्यापाशीं आम्ही आलों

ते म्हणाले, "तुम्हाला कुणीकडे....इकडे बावडेकरांच्या वाड्या-कडे का जायच आहे"

"नाहीं. या रस्त्यानं समोरच मला मारुतीच्या पाटीमागं जायचं आहे?"

"तसं असलें तर फारच छान!" ते म्हणाले, "मलाही तिकडेच ....ओंकारेश्वराच्या बाजूला जायच आहे."

"ओंकारेश्वराच्या बाजूला?" मीं विचारलें, "आपलं नांव काय बर!"

पण त्यानें सांगितलेलें नांव ऐकतांच मी अमळ घोटाळ्यांत पडलों. मनांत म्हटलें, "या नांवाचा मनुष्य, मला वाटत, चार पांच वर्षां-पूर्वी....एका भयंकर अपघातात...."

"का? विचारांत कसल्या पडलां?" असे किंचित् घाबऱ्या घाबऱ्या म्हणत तो चालूच लागला.

पाठोपाठ मीही निघालों. पुढें दोघेहि आम्ही पहिल्याप्रमाणें साव-काश चाल लागलों. दोन तीन मिनिटें कोणीच कांहीं बोललें नाहीं!

— २ —

ते म्हणाले, " 'स्वयंवर' नाटक हें आपल्या पुण्याच्या रंगभूमीवर नुकतंच आलं होतं, तिसरा....किंवा चौथा प्रयोग असेल. शनिवारची रात्र होती येवढी गोष्ट मात्र नक्की; मी आणि ...बायको असे उभयतां आम्ही नाटकाला गेलों. तिकिटें बऱ्यापैकीं काढलीं होतीं, आणि बसलों होतों तेंही जवळ जवळच...."

असें म्हणून क्षणभर ते थांबले, हातरुमाल काढून त्यांनीं डोळे पुसले, आणि सांगूं लागले पुढें, " गर्दी अलोट, आणि नाटक खूपच रंगत चाललं होतं. कृष्णचरित्र आणि तेंही इतक्या गोड कंठानं आणि जिवाभावानं गायलेलं. ऐकणाराचं अन्तःकरण कसं अगदीं भरून चाललं होतं! रुक्मिणीचं एक पद चाललेलं, तेव्हां तें आमच्या राणीसरकारांना कितपत आवडतं आहे हें पहाण्याकरितां मी वळलों मात्र, तों काय सांगूं तुम्हाला! डोळे असे काहीं भरून आले होते तिचे....! "

" होतं बुवा असं! " मधेंच मी म्हटलें, " खरं गाणं म्हणतात तें मला वाटतं अशालाच. "

" तशीच ती दिसतही किती प्रसन्न होती! तेंच....तेंच गोड चित्र दिसावं, जवळ ती असल्याचा भास व्हावा, म्हणून तर इतका जीव टाकीत मी पुनः पुन्हा....! "

पुढें बोलवेचना त्यांच्यानें. मारुतीचें दर्शन घेऊन आम्ही ओंकारेश्वराकडे वळलों. आमच्याशिवाय दुसरें तिसरें कोणी नव्हतें रस्त्यांत.

" हां! " पुन्हा ते सांगूं लागले, " ऐकावं तिकडं मग ज्याच्या त्याच्या तोंडीं या 'स्वयंवरा'तलीं पदं. आम्हीही, वरचेवर ग्रामोफोनवर

ढावीत असूं तीं गाणीं. पण....काय असेल तें असो, नाटक पाहून आल्यापासून तिला चैनच पडेनासं झालं! बरं, घरांत म्हणावं तर कांहीं कमी नव्हतं. सगळं तिच्या मनाजोगं होतं. असं असून...."

मारुतीमागील तिवाठ्यावर आलों, आणि थांबलों तिथें आम्ही. मधोमध रस्त्यांत उभे होतों.

"इथं रहातां का तुम्ही?" माझ्या घराकडे बोट करून ते म्हणाले, "झालंच बरं का माझं. पुढं.. त्या दिवसापासून बायको जी कोमेजत आणि खंगत चालली ती कांहीं केल्या म्हणून....विचार विचारून रडकुंडीस आलों मी! पण तिचं तिलाच जिथ उलगडेना, तिथं तें बिचारं काय सांगणार दुसऱ्याला! अखेरच्या वाताच्या झट-क्यांत वरचेवर ती म्हणे, 'तीं पहा! यमुनेच्या कांठीं आपले गोपाल-कृष्ण आणि गोपगोपी खेळताहेत! कसं गोड गाणं चाललं आहे नाहीं? यायचं ना मग तिथं?'"

असें म्हणतांच तो गृहस्थ काय पण गहिंवरून आला! खांद्यावर हात ठेवून मी समाधान करायला जातों आहें तों चालायलाच लागला.

मीही आमच्या खिडकीकडे, कोणाला तरी हाक मारून उठवा-यला म्हणून वळलों. पावलें दोन पावलं गेलों असेन, तों....काय वाटलें कुणास ठाऊक! चटकन् मागें फिरलों आणि ओंकारेश्वराच्या रस्त्यानें हळुहळू चालू लागलों.

इकडे तिकडे पहात मनांत म्हटलें, "आश्चर्य आहे! इतक्यांत हा गृहस्थ....क्षणा दोन क्षणात गेला तरी कुठं? आसपासचीं घरं तर बंदच आहेत कांहींच कुठं हालचाल दिसत नाहीं! मग हे बुवाजी ....आले कुठून, आणि गेले कुठें?"

असें म्हणून आजूबाजूला जों नीट न्याहाळून पहातों आहे तों ....जवळून....बरं का?....अगदीं जवळून....कुणी तरी भर्रकन् धांवत गेल्याचें....!!

लेखन ता. १९-५-१९३१.

प्रसिद्ध, 'रत्नाकर' गंधर्व अंक, जुलै १९३१.



*

# प्रवासी.

[ एक खडबडीत रस्ता. बरेचसे प्रवासी रस्त्यात बोलत उभे आहेत. दाट धुकें पडलें असल्याकारणानें आसपासचें कांहीं दिसत नाहीं. प्रवाश्यापैकीं तिघे चौघे म्हातारे असून, बाकीचे कोणी मध्यम वयाचे व कांहीं तरुण असे आहेत. दहा बारा वर्षांची दोन मुलें इतर वडील माणसाकडे टकमक पहात उभीं आहेत. ]

आजोबा, आपल्याला अजून किती लांब जायचें आहे हो ? आमचे पाय कीं नाहीं दुखायला लागले आहेत.

आलें, जवळ आलें अं बाळ

हो ! असें तुम्ही कितीतरी वेळां म्हणतां ! 'जवळ आलें, जवळ आलें' असें नुसतें म्हणतां पण तें कधीं संपतच नाहीं ! हें हो काय ? एकदा सांगा ना मग किती जवळ आलें आहे तें ? चालण्याचा आम्हाला अगदीं कंटाळा आला आहे !

असें काय वेड्यासारखें ! धुकें कोण पडलें आहे ! आणि मी काय सांगू किती जवळ आलें आहे तें !

मग तुम्ही कशावरून म्हणतां हो जवळ आलें आहे म्हणून ?

चपू बसा रे ! चारगट कोठली ! मोठ्या माणसांशीं कसें बोलावें, हें सुद्धा अजून यांना धड समजत नाहीं !

हं: ! मुकाट्यानं चालायचं दिलें सोडून, आणि लागले वटवट करायला ! बरें, पण आपण आलों आहोंत कुठें ?

मला वाटतें आपण रस्ता चुकलों.

नाहीं, नाहीं ! हाच तो रस्ता !

कशावरून म्हणतोस, हाच तो रस्ता म्हणून ?

कशावरून काय ! मला आपलें वाटतें येवढेंच.

सगळाच घोंटाळा ! वाट बरोबर आहे कीं चुकली, कांहींच धड समजत नाहीं !

आणि पुनः आलों आहोंत कुठें हेंही समजत नाहीं !

मैल दोन मैल आपण आला असूं नाहीं ?

येवढ्यानें होतें आहे ! सहज अडीच तीन मैल झाले असतील !

तीन मैल ? येवढेच हो कसे असतील आजोबा ? मला तर वाटतें कीं, आपण चांगले चार–पाच मैल आलों !

हं: ! चार पाच मैल कुठले आले आहेत ! अजून पुरतें मैलभर सुद्धां आलों नाहींत, तर म्हणे—!

काय, मैलभर काय नाहीं ! तें गांव सोडल्याला कांहीं थोडा वेळ झाला नाहीं ! चांगला तास दीड तास झाला असेल !

इतका कांहीं नाहीं म्हणा. फार झालें तर अर्धा किंवा पाऊण तास.

हो, हो, इतकाच.

नाहीं, नाहीं ! चांगला बराच वेळ झाला आहे !

बाकी आपण ज्या गांवांतून आलों, त्या गांवचं नांव मोठें गमतीचें आहे नाहीं ? मला अजून राहून राहून हसू येतें ! काय पहा ? कोणाला आठवतें का रे ?

नाहीं बोवा, आपल्याला कांहीं आठवत नाहीं. काय पाहा ?–हो, असेंच काहीं तरी आहे. टरगुन्–गुड्गुड्गुड् !

हं ! हं ! हं !

छे, छे: ! तसें नाहीं ! दुसरेंच कांहीं तरी आहे !

जाऊ द्या रे ! काय करायचें आहे त्याच्याशीं ! अशीं कित्येक तरी गांवें आपल्याला प्रवासांत लागतात ! कोण बसतो नाव आणि

गांव विचारीत ! आपलें ठराविक जागीं एखाद्या धर्मशाळेंत नाहीं तर देवळांत उतरावें, स्वयपाकपाणी करावें, झोंप काढावी आणि खुशाल पुढें चालतें व्हावें ! गावांत आहे काय, नाहीं काय, पहातो कोण ! आणि इतकें करायला येथें वेळ कोणाला आहे !

हो तर काय ! आणि आता आपण कोणत्या गांवाला जाऊन पोहचू आणि कोणत्या नाहीं, हें तरी कोणाला ठाऊक आहे !

हं: ! हः ! आपलें चालतों आहोंत झालें.

मग आतां चला ना पुढें. येथेंच किती वेळ उभें राह्यचें ?

पुढें काय चला ? धुकें किती पडलें आहे, आणि म्हणे पुढें चला !

छत् ! भलतेंच एखादें ! नाहीं आपल्याला बरोबर रस्ता माहीत, आणि उगीच कुठें एखाद्या जंगलात नाहीतर खोल दरींत जाऊन पडलों, तर करा काय !

नको रे बाबा तें पुढें जाणें ! आपलें आहे तेथेंच—

असें काय करतां हो ? ज्या वाटेवर आपण उभे आहों ती ही वाट पुढें कुठें तरी गेली असेलच कीं नाहीं ? आणि शिवाय आपण येण्यापूर्वी कोणी तरी माणसें या वाटेनें गेलींच असतील !

हो तर ! चांगला हमरस्ता दिसतो आहेन् ! ह्या काय बैल-गाड्यांच्या चाकोऱ्या चांगल्या स्पष्ट दिसत आहेत ! आणखी काय पाहिजे !

कांहीं नाहीं ! बेलाशक पुढें चला ! धुकें असलें म्हणून काय झालें ! उगीच वेळ घालविण्यात काय अर्थ आहे !

जा ! पुढें जा ! खुशाल चालते व्हा ! आम्ही साफ येथून हालत नाहीं ! उगीच पुढें कुठें तरी जाऊन मरावयाचें आहे !

हो ! आजपर्यंत या वाटेनें पुढें गेलेलीं माणसें जशीं कांहीं मेलींच असतील नाहीं !

कशावरून नसतील ? सगळेजण एखाद्या खड्यांत किंवा खोल दरींत पडून, चांगलीं टाळकीं फुटून कशावरून मेले नसतील ?

आणि मी म्हणतों दुसरे गेले, म्हणून आपणही गेलेंच पाहिजे, हें तरी काय म्हणून ?

हं: ! हं: ! हं: !

माझ्या मतानें तर बोवा असें वाटतें कीं, आपण आपलें आतां परत जावें, आणि खुशाल पुन: त्या धर्मशाळेंत जाऊन उतरावें !

हाँ ! हाँ ! कांहीं हरकत नाहीं ! फार छान ! चला, परत चला !

परत जायचें ? नाहीं बोवा, आपण नाहीं परत येत.

आणि पुन: आतां परत जायचें कुठें ? आणि तें कसें ?

कसें म्हणजे ? आलों त्या वाटेनें नीट सरळ पुन: धर्मशाळेंत जायचें !

अहो, पण तेंच सरळ आतां दिसतें आहे का ? तिकडेसुद्धा धुकें किती पडलें आहे ! आणि चालले परत !

म्हणजे ! आपण आपलें तसेंच गेलों, तर रस्ता चुकूं असें वाटतें कीं काय ?

कशावरून नाहीं ? रस्ता चुकून एखाद्या खड्यांत—आलें का लक्षांत !—किंवा एखाद्या खोल दरींत पडून, चांगलीं टाळकीं फुटून, कशावरून नाहीं मरून जाणार ? बोला आतां ?

अरे पण आपण आतांच ह्या रस्त्यानें आलों ना !

तें खरें ! पण ज्या रस्त्यानें आतां आपण आलों, तोच चुकला नसेल कशावरून ?

हं ! हं ! हं !

हो बाकी तेंही खरेंच आहे ! मग ?

मग काय ! धुकें नाहींसें होईपर्यंत आपण आपलें येथेंच उभे राहूं झालें.

हो हो हो, तसेंच करावें झालें !

काय, तसेंच काय करावें ? समजा, धुकें नाहींसें होईपर्यंत आपण येथें उभे राहलों आणि झाला, मधें येथेंच धरणीकंप झाला, किंवा दुसरेंच एखादें अरिष्ट येऊन आपण मरून गेलों तर ?

हो ! तेंही खरेंच !

म्हणून म्हणतों, आपलें पुढें चला; मग मरण आलें तरी हरकत नाहीं ! पण पुढें जाता जाता मेलों असें तरी होईल !

नाहीं बोवा ! आपलें त्यापेक्षां परत जातां जातां मेलेलें पुरवलें !

आणि त्याच्याही पेक्षां जागच्याजागींच मेलेलें काय वाईट ?

हं: ! हं: ! हं: !

ठीक आहे ! मी आपला पुढें चालता होतों. ज्यांना माझ्याबरोबर यायचें असेल, त्यांनीं खुशाल चलावें !

चला ! हे निघालों आम्ही तुझ्याबरोबर !

अरे ए ! चाललांत कुठें ? फिरा आमच्याबरोबर माघारीं !

नाहीं ! आम्ही नाहीं परत येणार ! तुम्हाला पाहिजे असेल तर तुम्ही खुशाल परत जा ! कोणी तुमच्या आड येत नाहीं !

तुम्ही नसाल आमच्या आड येत ! पण आम्ही तुम्हाला सोडूं तेव्हां ना !

असें कां? मग आम्हीही पहातों तुम्ही कसें परत फिरता तें ?

अरे ए मूर्खांनो ! मुकाट्यानें येथें उभे रहा ! आमचें ऐका !

नाहीं ! आम्ही तुम्हाला पुढें नेणार !

तुम्हाला आम्ही मागें खेंचणार !

खबरदार ! पुढें सरकाल तर ! येथल्या येथें तुम्हाला उभें राह्यलें पाहिजे ! मूर्ख कोठले !

कोण मूर्ख ?

तुम्ही मूर्ख !

नाहीं, तुम्हीच मूर्ख !

[ सर्वजण हातघाईवर येतात. एकमेकाना ओढाताण करूं लागतात. कोणी काठ्या मारतात, तर काहींजण दगडाचा वर्षाव करतात. बिचारीं मुलें घाबरून रडूं लागतात. 'मेलों !' 'डोकीं फुटली !' 'आई !' 'छातींत दगड बसला !' 'अरे तो पुढें पळाला !' 'धरा धरा' असा आरडाओरडा होऊन धांवपळ सुरू होते. ]

लेखन, ता. ५ ऑगस्ट १९१४.
प्रकाशन, ' उद्यान ', जानेवारी १९१७.



# भर चौकांत

[ आपल्या मनातील अत्यंत आवडते विचार किंवा हातून होणारीं कार्यें हींच काय तीं महत्वाचीं अशा डौलानें खालील 'भर चौकात' प्रवेश करा, आणि पहा मग आपल्या विचाराचा आणि कृत्याचा जगातील विविध व भिन्न विचाराशीं कितपत संबंध पोहोंचतो तो ! ]

नवा माल ! नवा मेवा !

* * *

हॉस्पिटल्‌मधून यायलाच उशीर झाला, त्या बाईची बॉडी फाडायची होती.

* * *

एक स्वारी, स्टेशन ! एक स्वारी !

* * *

मनिहटर्‌चाच अल्‌जिब्रा घे ! तोच छान आहे !

* * *

रावसाहेब, जोडे स्वस्त द्यायचे कोठून ! कातडेंच किती महागलें आहे !

* * *

करायचं कसं बाई ! ऐकलं नाहीं तर लाथा बसतील !

 * * *

यांच लेका ! तिच्याशिवाय कसं होईल ! आधीं अफू विकत घेऊं आणि—

* * *

माझा नेमच आहे ! गीतेची ओळ वाचल्याशिवाय अन्नच ग्रहण करायचें नाहीं !

* * *

जन्मच मुळीं आपला खाण्यासाठीं आहे !

* * *

तर काय हो ! उद्यां आतां पेन्शन घेणार, तों आपला काळच स्वारीनं राम —

* * *

बाबा ! मला बाजा घेऊन देतांना ?

* * *

आपला सॉनेट्वरचा लेख खरोखरच वंडरफुल् आहे ! क्रांति उडवून देईल !

* * *

नक्रोसें झालें आहे ! हजामत म्हणून मनासारखी होत नाहीं !

* * *

आः च्छा पेपरमीट ! पैसी पचास ! आच्छा पेपरमीट !

* * *

चलो ! हटो ! रस्तेमे गर्दी मत करो !

* * *

दोन लुगडीं त्यांना पसंत पडलीं ! बाकीचीं—

* * *

आऽय् कुलुं छत्र्या नीट करायचीं !

* * *

फर्गुसन् कॉलेज्‌मध्यें असतां नाहीं आपण? ज्यांचीं लग्नें व्हायचीं आहेत, अशा मुलांची यादी—

* * *

वावौ ! वावौ !

* * *

नांव कशाला काढतां ! वाकस मारावा असा म्हादबा सुतारानंच !

* * *

वा ! हेंच तर राजकारण ! आठ वर्षांनीं कायम केला ! तेव्हां नियमाप्रमाणें पहिलीं चार वर्षं आतां गट्टम् !

* * *

र्‍र्‍र ! आपला कोट का? केव्हांच तयार झाला आहे !

* * *

हं, मामा आहांत झालं ! दाढी केल्याशिवाय एक दिवस कॉलेज्‌मध्यें जाणं म्हणजे शुद्ध निर्मोपणा आहे.

* * *

अरे नारायणा! कोणाला तरी या आंधळ्याची दया येऊं दे रे !

*          *          *

हेड्क्लार्क्‌वर साहेब खूपच संतापला आहे !

*          *          *

ठणण्! ठणण् ! चलो बाऽजू !

*          *          *

कसं जुळावं हो ! लग्न ही संस्थाच मी म्हणतों अनॅचरल् आहे !

*          *          *

गरम चिवडा ! चिवडा सोलापुरी !

*          *          *

लॉ स्टडी करण्यांत मोठी गंमत असते, नाहीं ?

*          *          *

पोंऽ ! पोंऽ ! पोंऽ !

*          *          *

कशाचा आला आहे संसार ! निव्वळ स्वप्न आहे झाल !

*          *          *

अस्स ! याचं नाव शिताफी ! गर्दीतून सायकल न्यायला हवी !

*          *          *

हाः ! हा· ! काय आपटला पण !

*          *          *

काय कृष्णंभट ! उद्यांची कांहीं सोय ?

* * *

एकुलतें एक पोर ! पुरवली पाहिजे बाबा हौस.

* * *

मी तर म्हणतों, कीं दारू प्याल्यावरच मनुष्य खरा शुद्धींत—

* * *

किती गोड फोनोग्राफ् आहे ! थांब—

* * *

'मन माझें ! मन माऽझें भडकुनि गेलें'—

* * *

अढी आना ! कुइबी चीज उठाव ! अढी आना !

* * *

वा ! काय थाटाची अक्षत निघाली आहे हो !

* * *

बापरे ! पिअर्स् सोपूची पेटी घ्यायचें तसेंच राहिलं ! आतां !

* * *

राऽम बोलो, भाई राऽम ! राऽम बोलो !

* * *

ब्राउनिंग् तुम्हीं वाचला नाहींत अजून ? शेम् !

* * *

अहो, कांखेंत गांठ आली आहे ! मधून मधून वाताचे झटके—

*                *                *

डबर नीट कसं मिळेल आतां ?

*                *                *

राव ! पांखरूं पण पांखरूं आहे कीं नाहीं !

*                *                *

आग लागली ? कुठें ?

*                *                *

अरे रडायला काय झालं ? गोंधळलास काय असा ?

*                *                *

कोण धांदल आणि गर्दी ही !

*                *                *

कशास काहीं पत्ता असेल तर शपथ !

*                *                *

पण भाई, जिवंतपणा किती आहे सगळ्यांत !

*                *                *

रेवडी ! गुलाब रेवडी !

*                *                *

केलन, ता. १९ जानेवारी १९१३. प्रसिद्ध, 'रत्नाकर', मे १९२८



# पा ऊ स

[स्थळ—कोणतें तें वाचतांना हळुहळू समजेलच. पात्रें—हवेचे परमाणु.]

हुश्श ! काय रखरखीत ऊन पडलें आहे !

*　　　　*　　　　*

आणि पोटांत तर पाण्याचा लवलेश नाहीं !

*　　　　*　　　　*

पा....णी ! पोटभर तरी चांगलें पाणी प्यायला द्या हो !

*　　　　*　　　　*

ठेवलें आहे आतां चांगलें पाणी !

*　　　　*　　　　*

हें तर बाबा नेहमींचेंच आहे ! कमें चांगलें छानदार आणि हवें तितकें पाणी येतें. पण आपलें वाहून जातें !

*　　　　*　　　　*

मग आहेच आतां जुनाट विहिरींतील आणि तळ्यांतील नासकें, सडलेलें पाणी ! प्या तें आतां !

*　　　　*　　　　*

सगळाच मूर्खपणा ! जुनें तें घाणेरडें म्हणून त्यांतला गाळ काढला नाहीं, आणि नवें फार होईल....सोसायचें नाहीं म्हणून त्याची काळजी घेतली नाहीं !

*　　　　*　　　　*

शेवटीं आपले कोरडे ते कोरडेच !

*          *          *

पहा कशी जिकडे तिकडे प्रेतकळा आली आहे ती !

*          *          *

निराशा आणि भीति यांनीं तर आपण गांगरून गेलों आहोंत बुवा !

*          *          *

काय पुढें होणार तरी काय आपलें ?

*          *          *

दुसरें काय व्हायचें ? मरायचें झालें आतां !

*          *          *

नाहीं रे ! मला वाटतें अजून आपला यांतून निभाव लागेल !

*          *          *

नांव नको ! अहो, कुठें कांहीं चांगुलपणा असेल तर निभाव लागेल ना ? सगळा अप्पलपोटेपणा !

*          *          *

टिप्पुसभर पाणी ! पण त्यासाठीं कांपतों आहोंत दिवसाढवळ्या एकमेकांचे गळे !

*          *          *

राम राम ! कोण घाण....आणि दुर्गंधि सुटली आहे ही !

*          *          *

पा....णी ! पा....णी !

*  *  *

छे ! छे ! कोण पाण्यासाठीं धांवपळ ही !

*  *  *

आणि काय धुळींचे लोटचे लोट हे !

*  *  *

अहो, जीव कासावीस झाला ! गुदमरून मेलों ! पाणी !

*  *  *

अरे, मग निष्कारण धांवतां आहां काय असे ? मूर्ख कोठले !

*  *  *

पळा ! पळा ! स्वस्थ बसूं नका !

*  *  *

काय स्वस्थ काय बसूं नका ! फुकट नाश होईल झालें अशा धांवण्यानें !

*  *  *

पण नाशच होईल हें कशावरून !

*  *  *

हो, झालाच तर कदाचित् फायदा होईल यांतून !

*  *  *

ठेवला आहे फायदा ! कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं,

आणि नाहीं कोणी कोणाला विचारीत, तेव्हां कसला आला आहे फायदा ?

* * *

कांहीं असो ! सगळीकडे अस्वस्थता झाली आहे ना ? ठीक आहे ! तीच जितकी आतां वाढेल तितकी—रळा !

* * *

आहोहो ! काय वादळ सुटलें आहे हें ! धूळच धूळ ! कांहीं दिसेल तर शपथ !

* * *

नको नको ! परमेश्वरा, सोडीव रे बाबा या यातनांतून !

* * *

ठेवला आहे आतां परमेश्वर ! आवरी पळा ! आटपा लवकर !

* * *

कोण वेडेपणा हा ! अगदीं पिसाळून गेले आहेत कीं !

* * *

ओहो ! आले ! आले ! आकाशात ढग जमत चालले !

* * *

अरे, मग आतां तरी उगीच धावूं नका ! नाहीं तर चांगले आलेले ढग पार नाहींसे होतील.

* * *

काय विशाद आहे नाहींसे होतील ! आटपा लवकर ! उगीच आतां आळस करूं नका !

*                    *                    *

लागला ! पाऊस पडायला लागला !

*                    *                    *

पाऊस ! पाऊस ! !

*                    *                    *

वेड लागलें आहे वेड ! पाऊस कसा चांगला पडायला लागला आहे आणि आतां का रे उगीच धावपळ ?

*                    *                    *

खरेंच आहे ? पाऊस कसा आयता पडतो आहे ! तो तरी आतां नीट पडू द्या !

*                    *                    *

कुछ् नहीं ! असला अर्धवट पाऊस नही मंगता है !

*                    *                    *

मारे धुव्वा उडायला पाहिजे !

*                    *                    *

बरोबर ! चांगला जोराचा पाऊस पडायला हवा !

*                    *                    *

अहो पडायचा काय म्हणून ? चांगला झोडपून पाडला पाहिजे !

*                    *                    *

अरे राम ! काय पाऊस तरी हा !

*　　　*　　　*

पाहिलेंत ? मधांशीं अतिशय धूळ, आतां अतिशय पाऊस ! सगळा अतिरेकच !

*　　　*　　　*

दोन्हीकडून मरण !

*　　　*　　　*

येऊं द्या हो ! मरायचेंच तर धांवपळीनें तरी मरूं !

*　　　*　　　*

बापरे ! काय जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें आहे हें !

*　　　*　　　*

किती दिवसांच्या जुनाट विहिरी आणि तळीं ! पण तीं सुद्धा.... नवजीवनानें तुडुंब भरून वाहूं लागलीं आहेत !

*　　　*　　　*

याचें नांव काम ! घाण म्हणून आतां राहिली नाहीं ! पार सगळी....

*　　　*　　　*

हं: ! काय मघांशीं धूळ उसळली होती हो !

*　　　*　　　*

पण राव, आधीं इतकी धूळ उडाली, म्हणूनच हा इतका पाऊस झाला ना ?

*　　　*　　　*

खरें आहे बोवा !

* * *

चार थेंब पडल्याबरोबर स्वस्थ बसलों नाहीं, हें किती चांगलें केलें ?

* * *

तर काय ! थोडक्यांत समाधान मानलें, आणि अर्धवटपणा केला असता कीं वाटोळेंच !

* * *

अहो, तेंच आजपर्यंत भोंवलें !

* * *

बाकी कैक दिवसांत असा पाऊस झाला नव्हता, नाहीं ?

* * *

वाहवा ! काय जिकडे तिकडे टवटवी आली आहे !

* * *

तसेंच मघांशीं अक्राळविक्राळ आणि भेसूर दिसणारे हे ढग निरनिराळ्या तेजस्वी रंगांनीं काय खुलले आहेत पण !

* * *

अरे भाई आधीं इकडे बघ ! केवढें रे झाड पडलें आहे हें !

* * *

खरेंच कीं !

* * *

एँ: ! होतें काय त्यांत ! सगळें वठून तर गेलें होतें !

* * 

बिचारीं लहान लहान झाडें तर मोजायलाच नकोत !

*    *    *

हें काय बोलणें ! वादळ म्हटलें, म्हणजे असेंच व्हायचें !

*    *    *

ओहो ! काय आकाश इंद्रधनुष्य पडलें आहे हें !

*    *    *

तो पहा ! खोपटाबाहेर आपलीं मेंढरें घेऊन आलेला तो म्हातारा ....सूर्य प्रकाशांत किती गंभीर आणि तेजःपुज दिसत आहे !

*    *    *

पक्ष्यांची किलबिलसुद्धां किती गोड लागते आहे !

*    *    *

पाणीनें आणि धुळीनें भरून गेलेलें मघाचें हें वातावरण, आतां कसें अगदीं शुद्ध आणि पवित्र होऊन गेलें आहे, नाहीं ?

*    *    *

आणि सर्व चराचर प्रेमानें किती आर्द्र झालें आहे !

*    *    *

अहाहा ! जिकडेतिकडे गुलाबच गुलाब उधळून भगवान् सूर्यनारायण पहा कसें आपलें अभिनदन करतो आहे ! धन्य आहे—!

*    *    *

हे सूर्यनारायणा !

लेखन, ता. ९ आक्टोबर १९१४
प्रकाशन, 'रत्नाकर', नोव्हेंबर १९२८



# निजलेलें मूल.

[ स्थळ :—एक खोली अंधार असल्यामुळें खोलींत काय काय आहे, हें मुळींच दिसत नाहीं. आसपास अगदीं शांत आहे. चार पांच मिनिटां नंतर एकदम स्वच्छ पांढरा प्रकाश पडतो. एक पाळणा टांगलेला असून, त्याच्या किंचित् वरच लहानशा चेंडूयेवढा एक तेजस्वी गोळा चमकूं लागतो. पाळण्याच्या पलीकडे गादीवर एक पंचवीस तीस वर्षांची बाई निजलेली दिसते आहे. इतक्यात तो तेजस्वी पांढरा गोळा जोरानें गरगर फिरूं लागतो.]

मी ! जगांत येऊन मला चार महिने झाले.

*　　　　*　　　　*

[ मोठा आवाज होतो. तो गोळा फुटून त्याचे निरनिराळ्या रंगाचे पांचपंचवीस तुकडे होतात व ते एकमेकांभोंवतीं गरगर फिरूं लागतात. ]

*　　　　*　　　　*

बाळ ! मी तुझा आजा आहे. पाहिलेंस का माझ्याकडे ? संतापी नाहींना व्हायचास माझ्यासारखा !

*　　　　*　　　　*

अगबाई ! या माझ्या पणत्वंडाच्या नाकाची ठेवण थेट माझ्या नाकासारखीच आहे कीं !

*　　　　*　　　　*

नाक असेल तुमच्यासारखें ! पण तोंडवळा बहुतेक माझ्यासारखा—या त्याच्या चुलत आज्यासारखा आहे म्हटलें !

*　　　　*　　　　*

पण मी त्याला डाव्या पायानें थोडासा अधू करीन याची काय वाट ? लांबचा असलों म्हणून काय झालें !

*    *    *

—आणि मी ? मी सोडीन होय ? तुमच्याही पेक्षां लांबची आहें मी ! पहा त्याला नीट ऐकूं देतें का !

*    *    *

काहीं असो ! डोळे तर मी त्याचे तेजस्वी ठेवीन !

*    *    *

अरे जा ! काय ठेवतोस तूं ! सगळा जर मी सडून गेलों होतों ! नाहीं त्याला आंधळा केला तर नांव दुसरें ! कधीं म्हणून चैनच पडूं द्यायचा नाहीं मी !

*    *

बरें बरें ! पहातों कसा चैन पडू देत नाहींस तो ! असाल आपण एक सडलेले ! पण मी तर धडधाकट होतों कीं नाहीं ?

*    *    *

अरे पण माझ्याकडे कुणी पहातों आहे का ? रामराम ! कोण पोटदुखी ही ! बाळा !

*    *    *

काय हवें तें म्हणा ! मी काहीं त्याला आपल्या कचाट्यातून सोडणार नाहीं !

*    *    *

आणि मीही नाहीं !

*    *    *

मीही पण नाहीं ! !

*　　　*　　　*

[ सर्व 'मीही पण नाहीं ! मीही पण नाहीं !' असें म्हणून अधिकच जोरानें फिरू लागतात. पुन्हा मोठा आवाज होतो ! सर्व गोळे फुटून, निरनिराळ्या रंगाचे शेंदोनशें तुकडे होतात, व ते एकमेकाभोंवतीं गरगर फिरू लागतात. ]

*　　　*　　　*

अर हो हो, असे भांडतां काय ! तुमच्या हातांतूनही तो जात नाहीं, आणि आमच्याही हातचा सुटत नाहीं !

*　　　*　　　*

आणि आम्ही तर तुमच्याही पेक्षां आधींचे ! उगीचच भांडायचें ?

*　　　*　　　*

तेंच कीं ! बाळ !–माझ्या इतकी दारू पिशील ना ! निदान एक थेंब तरी ?

*　　　*　　　*

तूं लागेल तितकी पाजशील ! मीं पिऊं दिली पाहिजे ना !

*　　　*　　　*

उगीच बडबड आहे झालें तुमची ही ! म्हणे अमुक करूं देणार नाहीं, अन् तमुक करूं देणार नाहीं ! इथें काय स्वस्थ बसलों आहोंत होय आम्ही ?

*　　　*　　　*

चोरी करायला लावीन त्याला, चोरी करायला ! निदान चोरी करावी असें त्याच्या मनांत तरी खास आणीन ! कधीं सोडणार

नाहीं ! ऐसा बिलंदर चोर होतों मी—कमींत कमी दोनशें घरफोड्या केल्या असतील !

*　　　　*　　　　*

मोठा पराक्रमच कीं नाहीं ! बरें झालें बाई ! माझे दिवस आपले चांगले सदाचरणांत गेले !

*　　　　*　　　　*

विचारतो कोण तुमच्या सदाचरणाला ! कुकर्में करावीं अशीं मीच !

*　　　　*　　　　*

छे छे ! नको तें जिणें बोवा ! इतका वैतागलों मी, कीं शेवटीं गळफांस दिला आणि घेतली एकदांची सुटका करून ! पण माझ्या-मुळेंच याला जीव द्यावासा वाटेल कीं काय न कळे !

*　　　　*　　　　*

जीव देतोय् ! दुसऱ्याचाच घेईल तो ! मी काय इथें झोपा का घेतें आहे ? अशी भांडणें लावण्यात मी पटाईत होतें, कीं सांगतां सोय नाहीं ! खोटेंनाटें भरवून एकाचा तर तिच्या नवऱ्याकडून खून करवला !

*　　　　*　　　　*

भलतेंच ! आपलें देवाला भिऊन असावें हें बरें !

*　　　　*　　　　*

खुशाल असा भिऊन ! इथें देवावर विश्वास असेल तर शपथ !

*　　　　*　　　　*

माई, देवावरच काय, पण भुतांखेतांवर सुद्धां माझा विश्वास

आहे ! भून म्हटलें कीं, अंगाचा कसा थरकांपच होतो ! खुनाची धास्ती घेऊनच मी—

*　　　　*　　　　*

भेंकडच कीं नाहीं ! कुच डरना नाहीं ! ऐशी मजा मारावी कीं पार सगळ्या संसाराचें वाटोळें !

*　　　　*　　　　*

हं:, माझाच मुलगा तूं !

*　　　　*　　　　*

आणि वाटोळें न होईल तर काय होईल ? परस्त्रीचा लोभ हा या घराण्यांत कायमचा करून ठेविला आहे मी ! आणि तोही कैक वर्षांपासून ! या गुणापायीं भर बाजारांत जोडे खाल्ले होते मीं ! उगीच नाहीं !

*　　　　*　　　　*

एँ ! काय, कांहीं तरी सांगतोस ? मला नाहीं वाटत कधीं कोणा परस्त्रीचा मी–

*　　　　*　　　　*

कोणरे तो ?–चोरा, सगळें आयुष्य ठीक घालवलेंस, कबूल आहे ! पण मरतां मरतां तोंडाला काळें कसें फांसलेंस तें विसरलास वाटतें ?

*　　　　*　　　　*

अरे, लबाडी करणें हें आमच्या पांचवीला पुजलेलें ! विसरतोस कशाचा !

*　　　　*　　　　*

कोण आपण बोललात वाटतें ? पाणी पाहिलें कीं कसा थरकांप होतो, हें छान ठाऊक आहे आम्हांला ! आपण जाऊन नदींत जीव दिलांत आणि तें भोंवतें आहे आम्हांला !

*                    *                    *

बडबडा खुशाल हवें तें ! मी माझ्या बाळाला गायला शिकविणार आहे ! अशी सुरेख कथा करील, कीं डोलत राहतील सगळे ! कांहीं झालें तरी तो आपल्या आईच्याच वळणावर जाणार ! सूनबाई माझी हजारांतली आहे, सांगून ठेवतें !

*                    *                    *

आहे, ठाऊक आहे ! पण मी त्याला मुळीं चित्रें काढायलाच शिकवणार आहें !

*                    *                    *

आणि मी शिकवणार आहें त्याला आगी लावायला !

*                    *                    *

वा ! मोठा शहाणाच कीं नाहीं !

*                    *                    *

चूप बैस नाहीं तर थोबाड फोडीन !

*                    *                    *

ये ! कोणाचें थोबाड फोडतोस रे—?

*                    *                    *

[ सर्वजण हातघाईवर येतात, व पुष्कळ जोरानें फिरूं लागतात. मोठा आवाज होऊन, सर्व गोळे फुटतात. त्याचे हजारों तुकडे होऊन ते एकमेकाभोंवतीं गरगर फिरूं लागतात. ]

*                    *                    *

रामराम ! पहावें तेव्हा आपलीं भांडणें ! कधीं आपल्याला अंतच नाहीं का ?

*            *            *

नाहीं, सर्व आपण अविनाशीं—अमर आहोंत !

*            *            *

पण काय अमर असून उपयोग ? जर इथें कांहीं आपलें चालत नाहीं—

*            *            *

मी सुद्धा तेंच म्हणतों कीं, आपल्यांत जे हे हजारों येऊन मिसळले आहेत, ते आपलें फारसें चालू देत नाहींत ! मग उगीच अमर राहण्यांत काय अर्थ ?

*            *            *

कां ? त्यांचेंच नेहमीं चालतें असें थोडेंच आहे ! आपणही मधून मधून ठोठावतोंच कीं ! आणि असें हातपाय गाळून कसें चालल ? हजारों वर्षांचे आपण म्हातारे आहोंत ! गोष्ट खरी आहे ! पण जिवन्त आहोंत ना ! जरा नेट धरा, कीं माणसाचें मन ताब्यांत आलेंच म्हणून समजा !

*            *            *

पण फार गर्दी होत चाचली आहे बुवा आपल्यांत इथें !

*            *            *

ती तर व्हायचीच ! दिवसेंदिवस आत्मा हा अधिक गुंतागुंतीचा आणि कितीतरी अणुरेणूंचा होणार आहे !

*            *            *

खोंच मग बाळ, माझ्यासारखा झाडपाला आणि गवत कधीं खाशील का रे ?

*                    *                    *

तसें नको बाळ, नरडीचा चांगला घोट घे ! आम्ही जसे एकमेकांना फाडून खात होतो, तस्सें तूं कर !

*                    *                    *

कांहीं असो ! आपण जिवंत राहणार !

*                    *                    *

आम्हीही जिवंत राहणार !

*                    *                    *

[ सर्व 'आम्हीही जिवंत राहणार ! आम्हीही जिवंत राहणार !' असें म्हणत अतिशय वेगानें गरगर एकदम फिरतात, व एकमेकात मिसळून शेवटीं त्यांचा एक गोळा होतो. तो पाळण्यावर गरगर फिरू लागतो. ]

मी ! मीही जिवंत राहणार !

[ असें म्हणून तो गोळा पाळण्यात एकदम नाहींसा होतो. अंधार पडतो. इतक्यांत मूल रडू लागतें. गादीवर निजलेली स्त्री जागी होते, व उठून दिवा लावते नंतर मुलाला मांडीवर घेऊन त्याला पाजीत बसते. ]

लेखन ता. २६ जुलै १९१४. प्रकाशन, 'रत्नाकर', जून १९२६



# सुट्टी ! शाळेला सुट्टी ! !

[ स्थळ—रस्ता. सकाळीं साडेसात वाजण्याची वेळ. समोर पलीकडे जी गगनचुंबित इमारत दिसत आहे, ती एका अँग्लोव्हर्नॅक्युलर् शाळेची असून तिच्या दरवाज्यावर एक माणूस चतकोर कागदाचा तुकडा चिकटवीत आहे. इतक्यात दहा-बारा वर्षांचा एक मुलगा धावत धावत येऊन तो लिहिलेला कागद वाचूं लागतो. जवळच गटारात मेलेलें एक कुत्रें पडलें आहे. आलेले चिरंजीव टुणकन् उडी मारून— ]

सुट्टी ! सुट्टी ! ! बड्या ! विष्ण्या ! अरे गोंद्या ! आज शाळेला सुट्टी आहे ! !

* * *

ऑं ! काय म्हणतोस ? शाळेला आज सुट्टी ! वा वा ! फार छान झालें !

* * *

अरे, पण ती कशाबद्दल ?

* * *

रावबहादुर कोणतसे ते—वारले म्हणून.

* * *

कोण रे हे ?

* * *

असतील कोणीतरी ! आपल्याला काय, सुट्टी मिळाल्याशीं कारण !

* * *

अरे, हा देशपांड्या आला बघ ! कम् ऑन्, बी क्विक् !

*    *    *

ए पांड्या ! कुठें मंडईत निघालास वाटतें ? लेका ! शाळेला कशी छान सुट्टी मिळाली आहे, अन् मंडईत काय चालला आहेस ?

*    *    *

शाळेला सुट्टी ! कशावरून ?

*    *    *

ही बघ ! ही नोटीस बघ ! उगीच नाहीं !

*    *    *

खरंच कीं ! अरे, मग आज आपली गणिताची परीक्षा बुडाली !

*    *    *

बुडूं दे रे ! मोठा आला आहे लक्षाचा अभ्यासी !

*    *    *

अन् काय रे, इतका अभ्यास करून काय भीक मागायची, होय ?

*    *    *

बरं, चल आतां मला त्या बाळ्याला अन् रामड्याला आतांच्या आतां जाऊन कळवलंच पाहिजे, नाहीं तर उगाच त्याना हेलपाटा पडेल !

*    *    *

आणि हो ! मीही त्या आगाशाला अन् सहस्रबुद्धयाला जाऊन कळवतों !

*    *    *

पण ते लांब नाहीं का रहात ?

*　　　　*　　　　*

असेनात ! आतां हा पळत जाऊन त्यांना कळवून येतों !

*　　　　*　　　　*

पण हें बघ ए ! वाटेंत त्या जॉर्ज् वाशिंग्टन्‌ला नाहीं दाद लागूं द्यायची बरं का !

*　　　　*　　　　*

कोणाला ? त्या गिंग्याला ना ? नांव कशाला !

*　　　　*　　　　*

पडूं दे लेकाच्याला चांगला हिसका ! जिथें तिथें चोंबडेपणा करायला हवा !

*　　　　*　　　　*

तर काय ! अरे, यानें उठून सांगितलें म्हणून, नाहीं तर मास्त-रांना पत्ता लागत नव्हता कोणी कोयंडा काढला याचा !

*　　　　*　　　　*

अन् मी म्हणतों, खिडकी फडफडां वाजत राहिली असती, तर याच्या काय काकाचें गेलें असतें !

*　　　　*　　　　*

वा ! हें काय बोलणें ! अभ्या ...च् बुडतो ना !

*　　　　*　　　　*

पिटला पाहिजे धरून साल्याला एकदा !

*　　　　*　　　　*

हे आले एक दुसरे शहाणे ! केव्हांचे आम्ही इथें उभे आहोंत ! आणि हे—

*                    *                    *

काय हो गुंडेश ! अभ्यास करून करून काय मरायचें आहे वाटतें ?

*                    *                    *

खबरदार लेका, पुस्तकाला आज हात लावशील तर ! कशी झकास सुट्टी मिळाली आहे आणि चालला म्हसोबा अभ्यास करायला !

*                    *                    *

पण माय् डीअर् गोपाल, ही सुट्टी कशाबद्दल आहे ?

*                    *                    *

कशाबद्दल ? हें कुत्रें मेल्याबद्दल !

*                    *                    *

हः ! हः ! हः !

*                    *                    *

अर, ह्यो तर आपला मोत्या ! भोव् ! भोव् !

*                    *                    *

सबूर ! हीं कुठल्या बरें शाळेंतलीं मुलें येताहेत ?

*                    *                    *

काय हो, शाळेला आज सुट्टी आहे म्हणे ?

*                    *                    *

हो, आमच्या शाळेला आहे बुवा! तुमच्या शाळेला आहे कीं नाहीं कुणास ठाऊक!

* * *

एं: ! कसली त्यांची भिकार शाळा! ठेवली आहे त्यांना सुट्टी!

* * *

असू द्या हो शाळा आमची भिकार असली तर! तुमची मोठी श्रीमंत आहे ना?

* * *

हो, मग आहेच!

* * *

हॉ: ! आहे ठाऊक! परवाच तुमचे ते सुप्रिंटेंड पलीकडच्या त्या चौकांत आ वासून उताणे पडले होते!

* * *

मोठे इंजीन सायकलवरून चालले होते नाहीं?

* * *

अहो पण शहाणे, सायकलवरून काय कोणीही पडेल! तुमच्यां यांना तर धड चालताही येत नाहीं!

* * *

अरे, फेंगडोबा तर आहे शुद्ध!

* * *

अहो अहो, जरा तोंड संभाळून बोला!

* * *

काय, काय करणार हो तुम्ही ?

*　　　*　　　*

दांत पाडून टाकीन, ठाऊक नाहीं ?

*　　　*　　　*

आणि आमचे हात काय केळीं खायला गेलेत, होय ?

*　　　*　　　*

थांबा ! हात अटपा ! हात आटोपा ! उभय शाळांतील छकुल्यांनों, आज भांडण नाहीं ! कशी नामी मुट्टी मिळाली आहे, तेव्हां पत जेहेते म्हणतात:—

*　　　*　　　*

काय म्हणतात बरं—का....य ?

*　　　*　　　*

कीं, बापहो !

*　　　*　　　*

" सवरागगीं क्रिकेट्च्या आपण आहोंत शें उलट पांच ।

*　　　*　　　*

परि सवगीं मुट्टीच्या आपण एकत्र एकशें पांच ॥ "

*　　　*　　　*

पुंडलीक वरदे हरि विठ्ठल ! !

*　　　*　　　*

सीताऽकान्त....

*　　　*　　　*

हः ! काय गमत्या आहे रे !

*             *             *

ओ हो हो ! खूपच मुलें आलीं आहेत शाळेंतलीं आपल्या ! सुट्टी ! शाळेला सुट्टी !

*             *             *

आहे आहे, ठाऊक आहे ! मला तर आधींच सर्वांच्या अगोदर कळलें होतें कीं, आज सुट्टी आहे म्हणून !

*             *             *

मोठा शहाणा ! नोटीस चिकटवल्याबरोबर मीं–मींच जर पहिल्यानें ती पाहिली——

*             *             *

अहो पण दीड शहाणे ! इथें तुम्हीं पाहिली असेल, पण या पठ्याला तर सुप्रिंटेंडनीं आधींच दाखवली होती ! तिथें राहतो म्हटलें मी ! उगीच नाहीं !

*             *             *

हो का ! मग रे काय!

*             *             *

बाकी आपले सुप्रिंटेंड मोठे छान आहेत, नाहीं ?

*             *             *

हो तर ! आणि शिकवतातही किती फक्कड !

*             *             *

मारण्याचे म्हणून नांव नाहीं ! रामराजा आहे बिचारा !

*             *             *

नाहीं तर ते मागचे ! अहाहा ! काय पण–

*             *             *

गेल्या वर्षी नाहीं ! असेंच कोणीतरी मेलें होतें, तर या बाबानें आपली एक वाजता सुट्टी दिली !

*  *  *

एक वाजता कुठली असेल ? अरे, त्या वेळेला तर भाई नोटीस काढली !

*  *  *

आणि तीही बाबा अशी कांहीं काढली कीं, शेवटच्या वर्गांतून वाचून यायलाच मुळीं चार वाजले ! त्याच्यापुढें मग घटा !

*  *  *

छे, छे ! कांटाच काढला त्यांनीं पोरट्यांचा !

*  *  *

आणि असें पिटून काढलें कीं ज्याचें नांव तें ! धर पोर, कीं पीट ! धर पोर, कीं पीट ! हा सपाटा !

*  *  *

बरं शिकवणं तरी धड ?

*  *  *

हां: ! वर्गांत आले कीं उगीच कांहीं तरी व्यां....व्यां....

*  *  *

ह: ! ह: ! ह: !

*  *  *

बरं, पण ए बंपर ! आज तुला लवकर खेळयला आले पाहिजे ! काल माझी पहिल्या बॉलला वुइकेट् घेतलीस नाहीं का ? थांब ! आज चांगलाच तुला पिटून काढतों !

*  *  *

अत्रे जारे ! नाहीं तुझा पहिल्या बॉल्ला त्रिफळा उडवला तर कशाला पाहिजे !

*　　　*　　　*

थांबा ! हे आले एक शिष्ट !

*　　　*　　　*

मामाच आहे लेकाचा ! चांगलें सांगतों आहें कीं सुट्टी आहे म्हणून, तर म्हणे—

*　　　*　　　*

नको, तसें नको बुवा ! मला आपली नोटीसच वाचून पाहूं दे !

*　　　*　　　*

हं पॅहा ! नीट चांगले डोळे वासून पहा !

*　　　*　　　*

बाकी का—य मोठीशी सुट्टी मिळाली आहे ! दोन वाजतां नाहीं तरी मिळालीच असती !

*　　　*　　　*

उंः ! हें मोठें वाईट झालें ! शनिवारींच सुट्टी आली हें नाहीं ठीक झालं !

*　　　*　　　*

पेक्षां गेल्या सोमवारीं आली असती कीं नाहीं—

*　　　*　　　*

हां, हां ! म्हणजे फारच बहार उडाली असती ! कारण, शनिवारीं अर्धी—

*　　　*　　　*

आणि रविवार तर काय आपल्या बापजाद्यांचाच !

*　　　*　　　*

लगेच मग सोमवारची ही सबंध !

*　　　　*　　　　*

पुढें मंगळवारीं नारळी पौर्णिमा, अन् बुधवारीं श्रावण्या !

*　　　　*　　　　*

गुरुवारीं गव्हर्नरसाहेब आले म्हणून, अन् शुक्रवारीं येऊन गेले म्हणून !!

*　　　　*

म्हणजे ओळीनें आपला सहा साडेसहा दिवस चालला आहे धडाका !

*　　　　*　　　　*

हं—अं ! बरें चला ! नशीबच आपलें फुटकें, त्याला काय करायचें बाबा !

*　　　　*　　　　*

म्हणून म्हणतों कीं, हे सुट्टीसाठीं टाहो फोडणाऱ्या जीवांनो,

*　　　　*　　　　*

दुर्दैवानें वेळ साधिली म्हणुनी ऐसें घडलें,

*　　　　*　　　　*

इलाज नाहीं कांही त्याला नशिबच अपुलें फुटलें,

*　　　　*　　　　*

तेव्हां स्वस्थ रहा । घरचा मार्ग अतां सुधरा ! ॥

*　　　　*　　　　*

लेखन, मूळप्रत ता. १० आगस्ट १९१४

प्रसिद्ध सुधारून, 'रत्नाकर', सप्टेंबर १९२९

# ती बिचारी रडतेच आहे !

[ स्थळः—कोणाच्याही घरीं एक मोठा थोरला ग्रामोफोन् आहे. किल्ली दिलेलीच आहे. आता ही जी प्लेट् ठेवण्यांत येणार आहे, तिचें नांव ' ती बिचारी रडतेच आहे ! ' असें आहे. प्लेट् मोठी नामांकित आहे. करूं सुरू !—ऐका, ऐका ! बडबड नका करूं. ]

— १ —

ताई ! मी मंगळागौरीच्या पुजेला जाते अं ?

— २ —

लवकर ये हो !–देवा ! गत वर्षी मी अशीच नटून थटून पुजेला गेलें होते ना ! आणि यंदा ?–आई !

— ३ —

अरे ! कोण रडत आहे रे ?

— ४ —

असेल कोणीतरी ! आपल्याला काय करायचें आहे ! तूं आपला चहा पी लवकर; नाहीं तर निवून जाईल.

— ५ —

कुठलें आम्ही या शेजाराला राह्यला आलों आहोंत कुणाला ठाऊक ! रोज मेली कटकट ! रड बाई रड, आणखी रड !

— ६ —

खरेंच किती दुर्दैवी प्राणी आहे ! आतां हिचें पुढें काय होणार ?

— ७ —

राम्या, अरे खिडकींत उभा राहून काय वेड्यासारखा ऐकत आहेस? मंडईंत जातोस ना?

— ८ —

अग जातो ग! अझून माझे व्याकरणाचे नियम पाठ व्हायचे आहेत, आणि म्हणे मंडईंत जा! हं, काय बरें? ज्या शब्दांच्या योगानें पदार्थांबद्दल कसा व किती, कसा व किती, अशी विशेष अशी विशेष माहिती कळते, तीं सारीं विशेषणें, तीं सारीं विशेष माहिती कळते, तीं सारीं विशेषणें, तीं सारीं विशेष,—विशेषनामें.

— २ —

देवा! आतां माझें कसें रे होईल!

— ९ —

हं:! आमच्या त्या गणपतराव सुधारकांना तरी सांगितलें पाहिजे कीं ही एक गाळांत आयती गाय रुतलेली आहे, तर करा म्हणावें हिची लवकर सुटका!

— १० —

रडते आहे बिचारी! मागच्या जन्मीं जसें केलें, तसें आतां भरते आहे! काय करायचें बाई त्याला! कोणाच्या का हातचें आहे?

— ११ —

हं:! आहे काय त्यांच्यामध्यें! एकदम पुनर्विवाह लावून टाकायचा आणि सोडून द्यायचें!

— १२ —

हो ! जसा कांहीं तुह्मीच तेवढा विचार केला आहे नाहीं ?

— १३ —

अलबत् ! मीं विचार केलेला आहे म्हणूनच मी अधिकार वाणीनें सांगतो कीं, तुम्हीं जें हें सुधारणा, सुधारणा म्हणून चालवलेलें आहे तो सगळा येथूनतेथून बाष्कळपणा आहे !

— २ —

हाय रे देवा !

— १२ —

स्स् ! असा संताप येतो ! अरेरे काय बिचारी रडते आहे ?

— १३ —

अहो रडते आहे, मग त्याला आतां करायचें काय ? मला सांगा-ती जें हें रडते आहे, त्या रडण्याची आधीं मीमांसा नको का करा-यला ? ती कां रडते आहे ? त्या रडण्याची कारणें काय काय आहेत ? तसेंच तीं कारणें ज्या समाजांत आहेत तो समाज आरंभापासून आतांपर्यंत बनत कसा आला ? वगैरे गोष्टींच्या इतिहासाचा आधीं नीट पुष्कळ वर्षें अभ्यास करा, आणि मग पुढें !

— १४ —

ही जी मुलगी रडते आहे, ती मी अजून पाहिली नाहीं रे !

— १५ —

असें ? अरे मग ती पलीकडच्याच खोलींत आहे ! इकडे ये,— ती बघ. या दाराच्या फटींतून दिसते आहे, दिसली ?

— १४ —

अरे वा ! मोठी छानदार आहे रे !

— १५ —

आ—हे ! कांहीं विशेष नाहीं.

— १६ —

हरहर ! काय बिचारीच्या हृदयाला पीळ पडतो आहे ! एक हुंदका ! अनाथ विधवेचा एक हुंदका ! पण त्यांत केवढें ब्रह्मांड— किती काव्य भरलेलें असतें !

— १७ —

अहो असें एकीच्या रडण्यानें कुठें कांहीं होतें आहे ? एक काय— पण अशा पांच पन्नास जेव्हां एकदम रडायला लागतील, तेव्हां कुठें समाज हळू हळू जागा होईल, आणि मग आपलीं चिपडें पुसायला लागेल.

— १८ —

छे बोवा ! आमच्या या समाजात किती अन्याय भरला आहे, आणि किती नाहीं ! छे ! छे ! छे !

— १९ —

काय, छे, छे ! काय ? आमच्या समाजांत काय अन्याय भरला आहे ? उगीच कांहीं तरी बडबडावें ! अहो हें सगळीकडेच आहे ! त्यांत आहे काय मोठेंसें ! इंग्लंडांत, अमेरिकेंत, तसेंच अफ्रिकेंतसुद्धा तिथें नाहीं का अशाच मुली रडत ? तसेंच इथें उगीच कांहीं तरी—!

— २० —

कोण यमे ? कांग रडतेस ?

— २ —

आई ! आई ! !

— २१ —

अरेरे ! किती कळवळून रडते आहे रे !

— २२ —

ऐं: ! काय रडते आहे ! इतकें मोठ्यानें रडणें तिला आतां कांहीं शोभत नाहीं ! कांहीं तरीच अनॅचरल् !

प्रकाशन, 'सुधारक', ता. १९ आक्टोबर १९१४



# सगळेच आपण--ह्यः ! ह्यः !

## प्रवेश पहिला.

[ स्थळः—दोन खणाची एक खोली. खोलींतील सामानसुमान अव्यवस्थित रीतीनें ठेवण्याची किती खबरदारी घेण्यात आली आहे, हें आपल्याला उघडउघड दिसतेंच आहे. आरामखुर्चीवर वाकडेतिकडे बसलेले जे सद्‌गृहस्थ आहेत, त्याचें नाव चिंतोपंत हे आंग्लकवि शेक्सपिअर् याचें ' मिड्समर् नाइट्स् ड्रीम् ' हें नाटक वाचीत आहेत. ]

**चिंतोपंत**—ह्यः ह्यः ! मोठी मौज आहे बुवा ! या ' पक् 'सारखी आपल्याला जर थोडीशी गंमत करायला सापडेल, तर खरोखर किती बहार होईल, नाहीं ! ( पुनः वाचूं लागतो. इतक्यांत ' चिंतोपंत ' अशी आंतून एक हांक ऐकू येते. )

**चिंतोपंत**—कोण आहे ?

( आंतून )—मी आहे ?

**चिंतोपंत**—कोण तुम्ही ?

( आंतून )—आधीं दार उघडा, मग सांगतों मी कोण आहे तें !

**चिंतोपंत**—कट्कट् ! चांगला वाचीत होतों-( उठून दार उघडतो. ) येथें तर कोणीच नाहीं ! ( नीट इकडे तिकडे पाहून ) हांक तर चांगली स्पष्ट ऐकूं आली, आणि येथें—असेल कोणीतरी ! ( दार लावून घेतो. ) नाहीं तर तो खालचा राम्या असेल. वात्रट पोर ! खुर्चीवर बसणार, तोंच दारावर थाप वाजते. ) अरे !

( आंतून )—ह्यः ह्यः, चिंटोपँट् !

**चिंतोपंत**—काय चावटपणा आहे रे ! मार पाहिजे वाटतें !

( उठून दार उघडतो, तोंच एक सपक्ष व विचित्र पोषाख केलेला मुलगा आंत येतो. )

**चिंतोपंत**—( घाबरून ) आं! कोण ? (थरथर कापूं लागतो !)

**मुलगा**—ह्यः ! ह्यः ! काय घाबरलां आहांत हो ! मला ओळखलें का मी कोण आहे तो ?

**चिंतोपंत**—( नीट पाहून ) नाहीं.

**मुलगा**—नाहीं ओळखलें ? तुम्ही आतां वाचीत काय होतां ?

**चिंतोपंत**—शेक्सपिअरचें ' मिड्समर् नाइट्स् ड्रीम्. '

**मुलगा**—हो ना ? मग ओळखा आतां मी कोण आहे तो.

**चिंतोपंत**—नाहीं बोवा अजून काहीं बरोबर—

**मुलगा**—हेः, बरें, मघाशीं तुम्ही वाचतांवाचतां मध्येंच हंसलांत कां ?

**चिंतोपंत**—त्या नाटकांतील 'पक्' नें केलेली गंमत वाचली,–

**मुलगा**—म्हणून हंसलांत; आणखी म्हणालात काय ?

**चिंतोपंत**—हो, कांहीं तरी म्हटलें खरेंच ! काय बरें ?–हां ! कीं आपल्याला जर अशी पक्सारखी मौज करायला सांपडेल, तर–

**मुलगा**—अहो म्हणूनच तर मी तुमच्याकडे आलों आहें.

**चिंतोपंत**—म्हणजे ! तूं पक् कीं काय ?

**मुलगा**—हां ! ज्याची तुम्ही मनापासून आठवण केलीत, तोच मी पक् !* बोला आतां मी तुम्हाला काय गंमत दाखवूं ती ?

---

* पक् हें महाकवि शेक्सपिअर् याच्या ' मिड्समर् नाइट्स् ड्रीम् ' या नाटकातील यक्षकिन्नरांच्या जातीपैका एक पात्र आहे पण चालू लेखात याचा उपयोग दृश्याच्या मागें असणारें जें अदृश्य तें व्यक्त करण्याकरिताच काय तो केला आहे.

**चिंतोपंत**—गंमत का ? आहे माझ्या मनांतून एक करायची. पण ती जुळावी कशी ?

**पकू**—त्याची कां तुम्हाला काळजी ? तुम्हाला काय पाहिजे तें सांगा आधी.

**चिंतोपंत**—हें पहा, मला जर आतां एके ठिकाणीं जायला सांपडेल तर मोठी बहार होईल बोवा ! ( घड्याळाकडे पाहून ) हो ! ते आतां या वेळेला जमलेच असतील !

**पकू**—एवढेंच ना ? अहो, तें काम माझें ! कोठें घेऊन जायचें तें सांगा आधीं, म्हणजे मी हें फूल तुमच्या—

**चिंतोपंत**—काय ? हें माझ्या डोळ्यांत पिळणार ? नको रे बुवा !

**पकू**—अहो ! तें नाहीं हें फूल. हें दुसरें आहे.

**चिंतोपंत**—हां—मग हरकत नाहीं ! नाहीं तर भलतेंच कांहीं तरी—

**पकू**—तसें नाहीं हो ! हें फूल तुमच्या व माझ्या तोंडाभोंवतीं फिरवतों, कीं, दोघेहि आपण गुप्त ! कोणाला दिसायचे नाहीं आणि कांहीं नाहीं !

**चिंतोपंत**—हो का ? अरे वा !

**पकू**—मात्र एवढेंच, कीं, कोठेंहि कांहीं बोलायचें नाहीं, किंवा कोणाचाहि आपल्याला स्पर्श होऊं द्यायचा नाहीं ! जें काय दिसेल तें मुकाट्यानें दूर उभें राहून पहायचें, व ऐकायचें !

**चिंतोपंत**—ठीक आहे, कांहीं हरकत नाहीं. पण आपण एकमेकांना दिसणारच ना ?

**पकू**—हो हो !

**चिंतोपंत**—आणि दुसरें असें कीं, पुन: मी प्रकट कसा होणार ?

**पकू**–एँ: त्यांत काय आहे! आपण येथें परत आलों, कीं, तुमच्या तोंडाभोंवतीं पुन: हें फूल असें मी उलट फिरवीन, कीं, संपलें! मी खूण केल्याबरोबर तुम्ही तेथून हळूच माझ्या मागून या म्हणजे झालें! आणि हें पहा, मी जी ही गंमत दाखविणार आहे, ती तुम्हालाच तेवढी!

**चिंतोपंत**–वा वा! फारच छान!

**पकू**–चला आतां–मग उशीर नको! कपडे घाला आधीं.

**चिंतोपंत**–हे पहा घातलेच! (चिंतोपंत कपडे घालून तयार होतो, व हातांत काठी घेतो.) हं चला.

**पकू**–येथें नको. घराच्याबाहेर पडल्यावर गुप्त होऊं; आणि मग कोठें जायचें तें जाऊं.

**चिंतोपंत**–बरें, तसें करूं.

[ दोघेहि जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ स्थळः—दत्तोपंत दाभणभिशे याची माडी. मध्यभागी गालिचावर दत्तोपंत व राघोपत गप्पा मारीत बसले आहेत. जवळच पानतंबाखूचा डबा व पिकदाणी आहे. चिंतोपंत व पकू हे दोघे हळूच एका कोपऱ्यांत येऊन बसतात. ]

**दत्तोपंत**–पण तुम्ही तर त्याच्या नाटकावर मोठा चांगला अभिप्राय दिला आहे!

**राघोपंत**–दिला झालें! म्हटलें, आहे काय त्याच्यामध्यें एवढें मोठेसें! फारच तोंड वेंगाडायला लागला–तेव्हां देऊन टाकला!

**दत्तोपंत**—हं:—मीं सुद्धां वाचलें तें नाटक, पण मला बोवा इतकें कांहीं—

**राघोपंत**—अहो, कशाचें आलें आहे, अगदीं गचाळ आहे! कोठें एकदोन ठिकाणें चांगलीं असलीं म्हणजे झालें कीं काय? खरेंच जर पुसाल तर मला तें नाटक मुळींच आवडलें नाहीं!

**दत्तोपंत**—बरें, नाटकांतील भाषाहि फारशी चांगली साधली आहे असें म्हणावें, तर तेंहि नाहीं!

**राघोपंत**—छे: मुळींच नाहीं! किती तरी ठिकाणीं अशुद्ध आणि अस्वाभाविक आहे. अहो, भाषा चांगली येईल कोठून? त्या शिंच्याला धड व्याकरण समजत असेल तेव्हां ना!

**दत्तोपंत**—हं: हं:—इतकेंच नाहीं, पण दोनतीन ठिकाणीं तर ग्राम्य आणि अश्लील झाली आहे.

**राघोपंत**—खरेंच! अभिप्राय द्यायच्या वेळेला हें नाहीं माझ्या लक्ष्यांत आलें. मी आधीं धड वाचलें कोठें म्हणा तें!

**दत्तोपंत**—हं: हं:!

**राघोपंत**—खरेंच बोवा, चिंतोपंतांच्या त्या नाटकापेक्षां तुमच्या वडिलांचें तें काव्यच किती सुंदर आहे! वा! काय ती प्रतिभा! काय तो भाषेचा ओघ! छे बोवा, विलक्षणच प्रकरण तें!

**दत्तोपंत**—पण राघोपंत, त्याला आपल्या नाटकाची किती घमेंड आहे!

**राघोपंत**—अहो, त्याला स्वत:ची काय घमेंड कमी आहे!

**दत्तोपंत**—तें कांहीं विचारूं नका. हं:!

**राघोपंत**—मी सांगतों ना, तो शिंचा नेहमीं घमेंडींतच मरायचा! हं:—अगदींच मूर्ख आहे! जेथेंतेथें आपलें नाटक घेऊन नाचत

असतो, आणि अभिप्राय गोळा करीत असतो, झालें ! या अभिप्रायांचें आणि प्रस्तावनांचें अलीकडे एक खूळच माजलें आहे ! लिहिणारांनाहि अक्कल तितकीच असते, आणि अभिप्राय देणारांनाहि पण तितकीच असते ! ह्यः ह्यः—घ्या—पान घ्या !

**दत्तोपंत**—जाऊं द्या हो ! हें पहा राघोपंत, हें असेंच चालायचें.

**राघोपंत**—तसें नाहीं ! मी आपला निर्भीड माणूस आहे. आंत एक आणि बाहेर एक, हें मला नाहीं खपत !

**दत्तोपंत**—अहो, पण तें जगाला खपलें पाहिजे ना ? निव्वळ आपणां दोघांनाच एकमेकांचे स्वभाव आवडून चालत नाहीं !

**राघोपंत**—नाहीं आवडत तर मरूं दे शिंचें जग ! जरूर नाहीं—

**दत्तोपंत**—ह्यः ह्यः ! भारीच निर्भीड बोवा तुम्ही ! नाहींतर आमचे ते चिंतोपंत—

**राघोपंत**—हां हां, अहो, चिंतोपंत नका म्हणूं ! नाहीं तर—

**दत्तोपंत**—म्हणजे ?

**राघोपंत**—वा ! तुम्हाला नाहीं का ती गंमत ठाऊक ?

**दत्तोपंत**—नाहीं बोवा !

**राघोपंत**—अहो, परवां त्याला कोठें मी सहज चिंतामणराव असें म्हणालों, तों त्यानें मला सांगितलें, कीं, 'माझ्या नांवापुढें' 'मणराव' किंवा 'पंत' अशी अक्षरें लावलेली मला नाहीं खपत ! मला आपलें साधें सिंपल् चिंतो—

**दत्तोपंत**—ह्यः ह्यः अगदींच सिंपल्टन् आहे !

**राघोपंत**—तें कांहीं विचारूं नका ! तशीच शिष्याला आपल्या लेखनाची आणि वाचनाची घमेंड ! ती तरी किती पण ! ज्याच्या-

त्याच्या पुढेंपुढें नाचायचें ! आणि आपलें हें ! मला शेक्सपिअर समजतो, ब्राउनिंग् समजतो, शेले वाचतों, हें लिहितों आणि तें लिहितों !

**दत्तोपंत**–हंः हंः–पण खरेंच त्याला कांहीं समजतें का हो ?

**राघोपंत**–थोडकें समजतें आहे ! आम्ही शिंचे इतके शिकलों-सवरलों, पण अजून आम्हाला शेक्सपिअर आणि ब्राउनिंग् कांहीं सुद्धा समजत नाहीं ! आणि हें तर एस्. एफ्. झालेलें कालचें पोर ! या म्हसोबाला—

**दत्तोपंत**—हंः हंः हंः आहे ! चिंतोपंत ह्मणजे एक वल्ली आहे !

**राघोपंत**—नुसती वल्ली नाहीं, चांगला गांजा आहे गांजा !

[ दोघेहि मोठमोठ्यानें हंसू लागतात. इतक्यांत चिंतोपंतांना भान न राहून राघोपंताच्या पाठीवर ते जोरानें काठीचा तडाखा मारतात. राघोपंत 'अरे बापरे !' असें ओरडतो. तोंच खूण केल्याबरोबर, चिंतोपंत व पकू हे दोघेहि पळून जातात. ]

**दत्तोपंत**—( घाईघाईनें राघोपंतांच्या जवळ जाऊन ) काय, काय झालें राघोपंत ?

**राघोपंत**—आई ! आ–! कांहीं नाहीं ! केवढी पाठींत कळ निघाली हो !

[ तक्क्यावर मान ठेवून विवळत पडून राहतो. दत्तोपंत त्याच्याजवळ बसून पाठ चोळूं लागतो. ]

---

## प्रवेश तिसरा.

[ स्थळः—शहराजवळील एक टेंकडी. आसपास कांहीं श्रीमंत लोकांचे बंगले आहेत. टेंकडीवर दत्तोपंत व चिंतोपंत सायकाळची करमणूक करीत व गप्पा मारीत बसले आहेत. इकडे राघोपंत व पकू हे दोघे टेंकडीवर चढत आहेत, व हळुहळू बोलत आहेत. ]

**राघोपंत**—ते दोघे माझ्याविषयींच बोलत आहेत ?

**पकू**—आतां काय सांगावें ! अहो, मीं आधीं ऐकलें म्हणूनच तर इतक्या तांतडीनें तुम्हाला येथें घेऊन आलों. चला लौकर.

**राघोपंत**—पण हें बघ पकू, अशी मौज त्या चिंतोपंताला किंवा दत्तोपंताला दाखवायची नाहीं, बरें का ?

**पकू**—छेः छेः—भलतेंच एकादें ! तुम्हालाच तेवढी एकट्याला ! —हं—आतां अगदीं बोलूं नका. हळूच जवळ जाऊन—

[ दोघेहि सर्व कांहीं बोलणें ऐकायला येईल इतक्या बेतानें दत्तोपंताच्या व चिंतोपंताच्या जवळ जाऊन बसतात. ]

**चिंतोपंत**—मला तरी काय एवढी जरूर पडली आहे म्हणा ! आपले ते सहज माझ्याजवळ बोलत होते, म्हणून मीं हें तुम्हाला सांगितलें. तेंहि सांगितलें नसतें, पण तुम्ही पडलांत माझे स्नेही.

**दत्तोपंत**—नाहीं, सांगितलें हेंच ठीक केलें—असें काय ! बरें आहे म्हणावें !

**चिंतोपंत**—बाकी एकंदरीत माणूस बरा असावा.

**दत्तोपंत**—कशाचा आला आहे ! अगदीं पाजी आहे ! माझ्याविषयीं जर हा असें बोलतो, तर या राघोपंतांचेंच घराणें काय मोठेंसें चांगलें लागून गेलें आहे हो ?

**चिंतोपंत**—नाहीं बोवा, मला कांहीं विशेष—

**दत्तोपंत**—तुम्ही मला विचारा सगळें! मी सांगतों त्याचीं काय-काय कुलंगडीं आहेत तीं ! हा एवढा गबर झाला आहे कशावर? कोणाच्या जिवावर येवढ्या गाड्यान् धोंडे उधळतो आहे? त्या ट्रस्टीच्या प्रकरणांत काहीं थोडेथोडके पैसे नाहीं खाल्लेले ! चांगले पन्नाससाठ हजार रुपये खाल्ले आहेत !

**चिंतोपंत**—खरेंच कीं काय ?

**दत्तोपंत**—हं हं, उगीच नाहीं ! बापानें तर एकदोन विधवांचीं चांगलीं भरभक्कम डबोलीं मारलीं,म्हणून तर थेरडा सडूसडून मेला ! त्यांच्या वडलांनीं काहीं कमी गुण नाहीं उधळले ! ठाऊक आहे ?

**चिंतोपंत**—हं !

**दत्तोपंत**—तुम्ही मला विचारा—मला विचारा सगळें ! चुलत्यानें तर धडधडीत शूद्र स्त्रीशीं व्यवहार केला, म्हणून कोण मारामाऱ्या —कोण हाणाहाण्या ! सगळी फटफजिती !

**चिंतोपंत**—हं:, अगदींच विलक्षण !

**दत्तोपंत**—विलक्षण म्हणजे? किती विलक्षण ! मला तरी काय ठाऊक, तो लेकाचा स्वत:च सगळें हें एक दिवस मजजवळ ओकला! बापाची ही स्थिति, चुलत्याची ती स्थिती ! बरें, स्वत:च्या पोरांची तर धड असावी? तर तेंहि नाहीं !

**चिंतोपंत**—तें आहे मला ठाऊक.

**दत्तोपंत**—सगळेच दिवटे ! पोरें पाहिलीं तर लेकाच्याला खंडी-भर ! पण एकहि धड असेल तर शपथ ! थोरले चिरंजीव तर काय मुंबईलाच राहतात, आणि आपले लागेल तसे पैसे उधळीत असतात !

**चिंतोपंत**—अहो हें व्हायचेंच ! अपापाचा माल गपापा !

**दत्तोपंत**—बाप तर रोज पोरांच्या नांवानें माझ्याजवळ बोंबलत असतो! दुसरं चिरंजीव तर काय पहायलाच नको! पांचपन्नास वेळां मॅट्रिकूला बसले! पण शेवटीं बाजा! सकाळसंध्याकाळ टेनिस् खेळावें, ब्रिज् खेळावें, आणि रात्र झाली, कीं, सिनेमा नाहीं तर नाटकें, हा धंदा!

**चिंतोपंत**—हंः आहे! पठ्या वाघ आहे!

**दत्तोपंत**—ही झाली पोरांची रड! बरें, पोरी तर काय अगदीं फुटाण्याच आहेत! शाळेंत काय जातात, तऱ्हा काय करतात, कांहीं विचारूं नका! परवां त्या धाकटीनें तर मोठी मौजच केली! प्रत्यक्ष भाऊ मेलेला, आई, आजी प्रेताजवळ रडत आहेत, बाप उभा आहे, आणि ही आपली 'फटाके द्या! फुलबाजी द्या!' म्हणून रडतच बसली!

**चिंतोपंत**—वा! फारच छान!

**दत्तोपंत**—तुम्ही नुसतें उगीच त्याच्या सकाळच्या तासन्तास नाक धरून बसण्यावर जाऊं नका! असा लेकाचा डांबरट आहे! एकीकडे नाक धरून बसतो अन् दुसरीकडे खिडकींत उभें राहून दुर्बिणीनें बायकाचे चेहरे न्याहाळींत असतो! ती ही येते ती! तिच्याशीं दारें लावून तासन्तास गुळ्गुळ् गोष्टी करायला सांगा! असें वाटतें, एक फाड्कन् चांगली—

[ इतक्यांत रागानें लाल झालेला राघोपंत पुढें येतो, व दत्तोपंताच्या फाड्कन् तोंडात मारतो.

**दत्तोपंत**—( गाल चोळीत चोळीत ) आ—हा—हा—हा! काय एकाएकी दाढेंतून ठणक निघाली ही!

[ इकडे राघोपंत व पक् हे टेकडीमागें नाहींसे होतात. ]

**चिंतोपंत**—ठणक इतकी मोठ्यानें कशी हो निघाली !

**दत्तोपंत**—हो ! निघाली म्हणजे अशीच निघते मधूनमधून. आ—हा—हा, चला आतां अंधार पडायला लागला. आ—हा—हा !

[ दत्तोपंत गाल चोळीतचोळीत चिंतोपंताबरोबर टेकडीवरून उतरूं लागतो. ]

---

## प्रवेश चवथा.

[ स्थळः—मार्केट्. हौदाजवळ एक व्हिक्टोरिया उभी आहे. तिच्या पुढच्या बाजूला **राघोपंत** व **चिंतोपंत** बोलत उभे आहेत. जवळच **दत्तोपंत** व **पकू** हेहि त्यांचें संभाषण ऐकत उभे आहेत. इतर लोक जातयेत आहेत.]

**राघोपंत**—इतका जर हा दत्तोपंत चैनींत राहतो, तर मग याचें चालतें कसें हो !

**चिंतोपंत**—सांगितलें ना, याची टोपी त्याच्या डोक्यावर घाल, त्याचें पागोटें याच्या डोक्यावर घाल, हा उद्योग !

**राघोपंत**—तरीच !

**चिंतोपंत**—फुटकी कवडीही स्वतःच्या मेहनतीनें न मिळवितां वर्षभर ऐटीत कसें रहावें हें जर कोणाला शिकायचें असेल, तर त्यानें आमच्या दत्तोबांचा कित्ता गिरवावा. स्वारीच्या घरीं जाऊन तर पहा ! खुर्च्या, टेबलें अन् पुस्तकें, मारे ऐसा थाट आहे, कीं, यंव ! जसा कांही लॉर्ड् फॉक्लंड् !

**राघोपंत**—येः ! वर्णन तर मोठ्या बहारीचें केलेंत बोवा !

**चिंतोपंत**—बरें, इतक्या जिनसा विकत घेतल्या आहेत ना ! एकीचेहि पैसे दिले असतील तर शपथ !

**राघोपंत**—म्हणजे ?

**चिंतोपंत**—अहो, सगळा कर्जबाजारीपणा ! याचे पांच रुपये काढ, त्याचे दहा रुपये काढ, सदा हें ! कांहीं अब्रू आहे का त्या ठोंब्याला ? बरें, इतकें असून पुनः व्यवहारज्ञानाची किती ऐट !

**राघोपंत**—ह्यः ह्यः ह्यः !

**चिंतोपंत**—मी शहाणा ! सदा तोंडाशीं तर कुत्रें बांधलेलें ! याच्याशीं भांड, त्याच्याशी भांड ! वा ! मध्यें तर यानें एकदा भंग्याशीं मारामारी केली !

**राघोपंत**—भंग्याशीं ?

**चिंतोपंत**—हो ! तुम्हाला नाहीं का ठाऊक ? एक दिवस सकाळीं हे जों शौच्याला जातात, तोंच भंग्यानें घेतली पाटी काढून ! झाला संताप ! अन् काय ? बाहेर येऊन त्याच्याशीं मारामारी करायला सुरुवात केली !

**राघोपंत**—ह्यः ह्यः ह्यः !

**चिंतोपंत**—मग काय ! त्या वेळेला ही गर्दी !

**राघोपंत**—घाणेरडा तर इतका आहे, कीं, सुमार नाहीं. तंबाखूचा बोकणा भरलेला ! आणि जिथेंतिथें पचापचा थुंकायचें ! तसेंच शिंकरायचें झालें कीं नाहीं, म्हणजे नेसलेल्या धोतरांतच !

**राघोपंत**—ऐं !

[ चिंतोपत व्हिक्टोरियाच्या पायरीवर डावा पाय ठेवून उभा राहतो. इतक्यांत राघोपंतांचा कारकून मार्केटातून भाजी घेऊन येतो; व सर्व भाजी व्हिक्टोरियाच्या आत ठेवून पलीकडे उभा राहतो. ]

**राघोपंत**—आणली सगळी भाजी ?-ठीक आहे. चला आतां घरीं.

**चिंतोपंत**—मला तर त्याच्या नकटया नाकाचा इतका कांहीं संताप येतो, कीं, कांहीं पुसूं नका !

**राघोपंत**—ह्यः ह्यः !

**चिंतोपंत**—तसेंच हे पडले ठेंगू ! चालतांना जी कांहीं यांची धांदल होते, ती कांहीं विचारूं नका ! ते ढांगाळे गोविंदराव मोरे सपाटयानें चालले असतात, आणि हें जें अचे अचे हात करून जें कांहीं कुलंगी कुत्र्यासारखें धांवत असतें ! हाः ! हाः !

[ इतक्यात चिडलेला दत्तोपत पुढे होऊन चिंतोपताला चाट मारतो, तों चिंतोपत तोंडघशीं पडतो. दत्तोपत व पक्‌ हे नाहींसे होतात. राघोपत, त्याचा कारकून व कोचमन हे धावत जाऊन चिंतोपताना उभे करतात. आसपासचे लोक गोळा होतात. ]

**राघोपंत**—काय झाले हो चिंतोपत ?

**चिंतोपंत**—कांहीं नाहीं ! थंडीनें पायाला सहज वाताचा झटका बसला.

**राघोपंत**—बसा. गाडींत बसा, चला.

[ उभयता गाडींत बसून जातात.

---

## प्रवेश पांचवा.

[ स्थळः—राघोपताचा दिवाणखाना. समोरच पुस्तकाचीं चार कपाटें आहेत. मध्ये एक राउंड् टेबल् असून त्याच्याभोंवती खुर्च्यांवर **राघोपंत**, **दत्तोपंत** व **चिंतोपंत** बसले आहेत. टेबलावर कपबशा आहेत. राघोपंत तिन्ही कप्समध्यें किटलींतून चहा ओततात. प्रत्येकजण आपापला कप घेऊन बशींत चहा ओतून पिऊं लागतो. पक् जवळच उभा आहे. ]

**राघोपंत**—( बिस्किटांचा डबा दत्तोपंतांच्या पुढें सारून ) घ्या हो, घ्या, बिस्किटें घ्या.

**दत्तोपंत**—( एकदोन बिस्किटें घेऊन ) बाकी आज चहा फारच छान झाला आहे बोवा ! नाहीं चिंतोपंत ?

**चिंतोपंत**—अहो, आजच काय ! राघोपंतांच्या येथला चहा नेहमींच चांगला असतो. येथल्यासारखा चहा गावांत कोठें नसतो तो !

**दत्तोपंत**—नुसता चहाच काय, पण राघोपंताचें सगळेंच चांगलें असतें.

**चिंतोपंत**—यांत काय संशय !

**राघोपंत**—ह्यः ह्यः ह्यः ! आपलें म्हणजे एक त्रिकूट आहे ना ! दत्तोपंतांवांचून राघोपंताला करमायचें नाहीं, राघोपंतांवांचून चिंतोपंतांना करमायाचें नाहीं ! अगदीं त्रिमूर्ती दत्तात्रय !

**दत्तोपंत**—ह्यः ह्यः—चाललेंच आहे.

**राघोपंत**—जिथें जाल तिथें आपले तिघे ! काल नाटकालासुद्धा, तिघे बरोबर !

**चिंतोपंत**—खरेंच, कालचें नाटक आपल्याला फारच आवडलें बोवा !

**दत्तोपंत**—मलासुद्धा फार आवडलें, तोंडावर स्तुति व पाठी-मागें निंदा करणाऱ्या लोकांची ऐशी उडवली आहे त्याच्यामध्यें, कीं यंव !

**राघोपंत**—जग पाहिलें तर शिचें असेंच आहे. तोंडावर स्तुति आणि पाठीमागें निंदा, हें सगळीकडेच आहे ! ह्यः !

**चिंतोपंत**—अहो, हें चालायचेंच ! पाठीमागें शिव्या देत नाहीं कोण ? सगळे देतात ! पण पुनः समोरासमोर आलों, कीं, सगळे आपण—ह्यः ह्यः !

**राघोपंत**—ह्यः ह्यः ! बहोत खाशी ! कविराज, बहोत खाशी !

**दत्तोपंत**—बहोत खाशी ! ह्यः ह्यः !

**चिंतोपंत**—बाकी मी तर म्हणतों, कीं, अशा लोकांना मारे काठीखालींच झोडपून काढावें ! ह्यः ह्यः !

**राघोपंत**—नाहीं तर त्याच्याहिपेक्षां चांगल्या तोंडातच भडकवाव्या—ह्यः ह्यः ह्यः !

**दत्तोपंत**—नाहीं, नाहीं ? चांगल्या लाथा मारून तोंडघशीं पाडावें, तोंडघशीं ! ह्यः ह्यः ह्यः !

[ सगळेच ' कशी फजिती केली ! ' अशा भावनेनें एकमेकाकडे पाहून मोठमोठ्यानें हसूं लागतात, तोंच पक्हि ' कशी फजिती केली ! कशी फजिती केली ! ' असें म्हणून मोठमोठ्याने हंसू लागतो. तिघेहि चकित होऊन एकमेकाकडे पाहू लागतात. ]

लिहिलें, ता. १० जानेवारी १९१५

प्रसिद्ध, '**मासिक मनोरंजन**' जुलै १९१५



# ऐट नको करूंस !

## प्रवेश पहिला.

[ **स्थळ**—एक लहानशी खोली. आत शिरण्याचें दार समोर भिंतीला मधोमध आहे. डाव्या बाजूला दोन मोठ्या खिडक्या आहेत; पण त्या आतून लावून घेतल्या असल्यामुळे बाहेरचें काहीं दिसत नाहीं. उजव्या हाताकडे पलीकडील कोपऱ्यातल्या दाराकडे पाहिलें, तर त्या बिचाऱ्याला क्वचितच आपले मन मोकळे करून बोलण्याची परवानगी मिळत असावी, असें त्याच्या तोंडाला बसलेल्या गंजलेल्या कुलुपावरून सहज दिसून येईल. समोरील दाराला लागून उजव्या हाताला एक साधें टेबल असून, त्याच्यावर सात आठ पुस्तकें, टाइमपीस्, लिहिण्याचे सामान, हिंक्स्चा दिवा वगैरे जिनसा आहेत. टेबलाखालीं सारून ठेवलेली खुर्ची दिसतेच आहे. तसेंच वर कविवर्य शेले याचा फोटो असलेले एक क्यालेंडर् टेबलाच्या अमळ वर भिंतीला लावलेलें आहे. दोन खिडक्याच्या मध्यभागीं एक लहानशी पेटी ठेवलेली आहे. कपडे वगैरे ठेवण्याकरिता समोर डाव्या हाताकडे भिंतीला दोन खुट्या आहेत. खोलीच्या तुळईच्या अलीकडे पूर्व-पश्चिम सतरजी पसरली असून तिच्यावर गोळा करून ठेवलेली वळकटी आहे. घड्याळात अकराचे ठोके पडतात. चारपाच मिनिटानतर गणपतराव समोरील दार उघडून आत येऊ लागतात. अंधार असल्यामुळें पलीकडचें काहीं दिसत नाहीं. ]

[ आंतून ]—हें रे काय ! दोघेहि आपले रस्त्यातच बोलत उभे !

**गणपतराव**—( दारांत थांबून ) अहो, त्याला आंत ये म्हटलें मीं. पण तो आलाच नाहीं त्याला काय करणार ! हं: ( अंगांतील सदरा काढून खुंटीवर ठेवतो )

[ आंतून ]—कोण विनू आला होता वाटतें ?

**गणपतराव**—( वळकटी पसरतो ) हो तोच आला होता.

[ आंतून ]—इतक्या रात्रीं काय त्याचें काम होतें ?

**गणपतराव**–नाहीं, तसें कांहीं नाहीं. आला होता आपला सहज, झालें. ( किंचित् थांबून दार लावून घेतो व आंतून कडी घालतो. नंतर घड्याळाकडे पाहून ) चला ! अकरा वाजून गेले. निजलेंच पाहिजे आतां. ( घड्याळ हातांत घेतो. ) सकाळीं लवकर उठायचें आहे. ( घड्याळाला किल्ली देऊं लागतो. ) कशाचें काम आणि काय ! नसत्या भानगडी करतात, ( घड्याळ टेबलावर ठेवून देतो. ) आणि मग बसतात रडत. (गादीवरील ब्लॅंकेट् काढून पलंग-पोसानें गादी झटकूं लागतो. ) बोडक्याचा करतात रोमान्स् आपल्या ! कुठें तरी वाचतात, कांहीं तरी ऐकतात, आणि सुटतात नाचत झालें! आयडिअल् रोमान्स् करायचा तर खुशाल आपल्या घरीं करावा. ( गादीवर नीट पलंगपोस पसरून ब्लॅंकेट् झटकतो. ) लोकांना कां ताप ! ( ब्लॅंकेट् गादीवर ठेवतो. ) बरें, पुनः सांगायची सोय नाहीं. हें आपल्या व्यक्तिस्वातंत्र्याच्याच शेखीमध्यें ! आणि सदा बायकांच्या गोष्टी. 'मी ह्यांच्या घरीं गेलों होतों, आणि त्याच्या घरीं गेलों; आणि ती असें म्हणली अन् मी असा खिदळलों !' काय हें ! ( टेबलाजवळ जाऊन दिवा विझवतो. )नाहीं, झालें नाहीं कांहींसुद्धा. पण जगांत वागायचें म्हणजे मोठें कठीण काम आहे, अन् त्यांतून बायकांच्या बाबतींत तर फारच जपलें पाहिजे ! ( थाबून ) हो तर काय ! आधीं परक्या बायकांशीं बोलाच कशाला ! मग चेष्टा करणें तर दूरच ! ( थांबून )आपलें जपून असायला पाहिजे येवढें खरें. बाकी मी काय सांपडतों म्हणा असा. त्याच्यासारखा लेचापेचा नाहीं आहे मी ( कांहींतरी खसबजल्यासारखा आवाज होतो. ) काय बरें वाजलें

आतां ? ( थांबून ) असेल त्या दाराच्या पाठीमागें कांहीं तरी. बरेच दिवस झाले. एकदा उघडून आंतून नीट झाडून घेतलें पाहिजे. ( थांबून ) गोष्ट विनूच्या मनाला लागून राहील बाकी. बिचाऱ्याला नीट झोंपसुद्धां यायची नाहीं. हं ! चालायचेंच. कोंवळ्या मनाच्या माणसांचें असेंच व्हायचें. चूक साधी का असेना; पण त्याच्या जिवाला ( थांबून ) ती जन्मभर टोंचीत राहील. ( थांबून ) ऐकल्या-पासून मलासुद्धा कसेंसेंच—झोंपच येत नाहीं ! ( थांबून ) चला, निजा आतां नाहींतर परवांसारखीं, भयंकर स्वप्नें——

---

## प्रवेश दुसरा

[ **स्थळः**—गणपतरावाचीच खोली, पण ती त्याना स्वप्नात दिसत आहे. कोपऱ्यातील दाराचें कुलूप आपोआप निघून कडीही निघते. नतर दार उघडले जाते. खोलींत तावडा उजेड पडतो. दारातून एक मोठी आकृति बाहेर येते. पायापर्यंत काळा झगा घातलेला असून, डोक्याचे व दाढीचे काळे केस पाठीवर, खाद्यावर, व छातीवर लाबवर पसरले आहेत. आकृतीच्या तोडाचाही रग काळाच आहे. गणपतराव बिछान्यावर तोंडा-पर्येत पाघरून घेऊन निजले आहेत ]

**गणपतराव**——( बरळत ) कोण तूं !

**काळी आकृति**——( गणपतरावाजवळ उभी राहून ) मी आहे.

**गणपतराव**——( बरळत ) कोठून ?....

**काळी आकृति**——अंधारातून. ( थांबून ) तुला न्यायला आलों आहें. सगळें बोलणें तुझें ऐकलें. तूं येशील असें वाटतें. मग काय ?

[ इतक्यात पेटीपलीकडील खिडकी उघडून, एक तेजःपुज व पाढरी शुभ्र आकृति आत येते. तिच्या अगात पाढरा झगा असून, तिच्या दाढीचे

व डोक्याचे पाढरे केस पाठीवर, खांद्यावर व छातीवर पसरले आहेत. मधून मधून ताबूस रगाची झाक मारणारा असा पाढरा प्रकाश खोलींत पडतो ]

**पांढरी आकृति**---चल, दूर हो. [ गणपतरावाजवळ जाऊन उभी राहते. ]

**गणपतराव**---( बरळत ) को--ण ?

**पांढरी आकृति**---मी प्रकाशांतून आलों

**गणपतराव**---( बरळत ) कशाला---?

**पांढरी आकृति**---तुला वाचवायला.

**काळी आकृति**---नाहीं, तो आतां तुझ्या ताब्यांत राहीलसें दिसत नाहीं

**पांढरी आकृति**---पण मी रात्रंदिवस सारखा त्याच्याजवळ.

**काळी आकृति**---मीसुद्धा आहे.

**पांढरी आकृति**---तो वागतो माझ्याच तंत्रानें....

**काळी आकृति**---काहीं नाहीं. मी आता त्याला पकडला आहे.

**पांढरी आकृति**---तो कसा ?

**काळी आकृति**---त्याच्याच अभिमानानें....

**पांढरी आकृति**---हो, खरेंच.

**काळी आकृति**---तेव्हां आतां प्रत्यक्ष सृष्टींतील कोणाला तरी चिथावून मी ह्याला ताबडतोब आपल्या ताब्यांत---हः ! त्याला वाटलें माझें कोणी ऐकलेंच नाहीं !

**पांढरी आकृति** ---आधीं माझें ऐक, मी काय म्हणतों....

**काळी आकृति**---एकदा सोडून शंभर वेळां.

**पांढरी आकृति**—ह्याला, ताब्यांत आणण्याकरितां....तूं जें प्रत्यक्ष सृष्टींत करणार....

**काळी आकृति**—तें आधीं....स्वप्नसृष्टींत....येवढेंच कीं नाहीं.

**पांढरी आकृति**—हो तसेंच.

**काळी आकृति**—ठीक आहे. पण . मला नाहीं वाटत त्याचा कांही उपयोग....

**पांढरी आकृति**—असें कां म्हणतोस ?

**काळी आकृति**—कारण....किती तरी वेळां असें आपण करतों....पण कोणी लक्षच....

**पांढरी आकृति**—आपल्याकडून जितके आधीं दाखवायचें तितकें....

**काळी आकृति**—बरें आहे, कांहीं हरकत नाहीं....मला पुष्कळच धीर ...हं !

**पांढरी आकृति**—कां हासलाससा ?

**काळी आकृति**—कारण....मी इतक्या तुला सवलती देतो.... तरी....गर्दी माझ्याकडेच....याचा कधीं शेवट नाहीं का ?

**पांढरी आकृति**—नाहीं, हें असेंच चालायचें....

**काळी आकृति**—पण दिवसेंदिवस जग तर....तो पहा....तो मनोरा किती उंच ...उंच....

**पांढरी आकृति**—भोंवळ येऊन तितकाच सपाटयानें खालीं....

---

## प्रवेश तिसरा

[ स्थळ—गणपतरावाच्या स्वप्नातील बाग. बाकावर सरासरी पंचवीस व अठ्ठावीस वर्षांचे असे दोघेजण बसले असावेत असें वाटतें. ]

**पहिला**—खरेंच का आपण येथें आलों आहोंत ?

**दुसरा**—हो, हो, ती बाग ही !

**पहिला**—पण येथें कसे आलों बोवा !

**दुसरा**—तें काहीं ठाऊक नाहीं.

**पहिला**—मग मघाचें स्वप्न कीं आतांचें स्वप्न ? मघाशीं आपण पॅरिस्‌मध्यें....

**दुसरा**—काय बोवा, मला कांहीं....कसें अन् काय इथें आलों आहोंत खरें.

**पहिला**—पण आपण इकडे सासून् इस्पितळापाशीं कसे ?

**दुसरा**—अरे, ती पहा गमत !

**पहिला**—खरेंच कीं !

**दुसरा**—आणि इस्पितळापाशीं न्हाव्याचें दुकान ?

**पहिला**—तो कोण गणपतराव का ?

**दुसरा**—हो. तोच तो.

**पहिला**—अरे, तो तर त्या माणसाची हजामत करतो !

**दुसरा**—शाबास ! सगळें सोडून दिलें आणि हा धंदा आरंभला का.....

**पहिला**—हं. बरी फजिती झाली आहे !

**दुसरा**—अंः त्याची उडवायला रे किती वेळ !

**पहिला**—माझ्या मनांतून फार आहे कीं या गणपतरावाची एकदा....

**दुसरा**—कारण ?

**पहिला**—फार त्याला घमेंड आहे असें दिसतें.

**दुसरा**—ती कशाबद्दल ?

**पहिला**—बायकांच्या बाबतींत....आपण कधीं चुकलों नाहीं, अन् कधीं....चुकणारही नाहीं.

**दुसरा**—असें का ? अरे वा: ! स्वारी कधीं बोलली होती वाटतें....

**पहिला**—नाहीं, बोलला नाहीं.

**दुसरा**—मग कशावरून म्हणतोस ?

**पहिला**—मला आपलें कळलें आहे.

**दुसरा**—तेंच कसें तें सांग ना.

**पहिला**—कसें तें कांहीं... पण कळलें आहे येवढें खरें....

**दुसरा**—हं: ! काय पहा !

**पहिला**—काय झालें ?

**दुसरा**—तूं बोलायला, अन् मला युक्ति सुचायला, एकच गांठ....

**पहिला**—वा ! मग काय छानच.... !

**दुसरा**—पण. . एक मोठी अडचण आहे बोवा.

**पहिला**—ए: ! अडचण कसली आली आहे त्यात !

**दुसरा**—नाहीं, होईल तेव्हांच. पण या कामात....

**पहिला**—माझ्या बायकोची मदत पाहिजे....

**दुसरा**—हं, येवढेंच.

**पहिला**—मग काय तेव्हांच....

**दुसरा**—त्यांत कांहीं त्यांना....

**पहिला**—ठीक आहे.

**दुसरा**—कसें करायचें तें....
**पहिला**—आलें लक्षांत.
**दुसरा**—ठरलें तर....
**पहिला**—ठरलें म्हणजे....ठरलें म्हणजे.. .ठरलें म्हणजे....
**दुसरा**—वा ! तूं तर नाचायलाच....मग मीही....
**पहिला**—आपल्याबरोबर.. .
**दुसरा**—ह्या सगळ्या इमारतीही....

---

## प्रवेश चौथा

[ स्थळ—स्वप्नातील तीन चार खणाची खोली. समोरील भिंतीजवळ एक टेबल् असून, त्याच्याच डाव्या बाजूस आरामखुर्चीवर गणपतराव वाचीत बसले आहेत. इतक्यात एक बावीस तेवीस वर्षाची बाई आत येते, व टेबलाच्या उजव्या बाजूकडील खुर्चीवर बसून कागदावर काहीं लिहू लागते.]

**बाई**—( लिहितां लिहितां मध्येंच थांबून ) कां आज फार....
**गणपतराव**—नाहीं काहीं विशेष. .
**बाई**—मला आपल्याला एक....
**गणपतराव**—कांहीं विचारायचें आहे ?
**बाई**—आपण ऐकाल तर....
**गणपतराव**—अगदी जरूर....
**बाई**—मला कीं नाहीं इकडचा स्वभाव....
**गणपतराव**—अरेरे ! अशा एकदम....
**बाई**—भारीच जाच हो !....तुम्हाला दिसत नाहीं....पण....

**गणपतराव**—मला नव्हतें ठाऊक इतका तो....
**बाई**—किती पण....भारीच हो....
**गणपतराव**—मग त्याला आतां....
**बाई**—आपण जर....
**गणपतराव**—बरें आहे, मी पहातों सांगून....
**बाई**—सांगूं नका गडे ..
**गणपतराव**—मग ?. ..
**बाई**—जा मेलें ! अजून सुद्धा....
**गणपतराव**—म्हणजे !....माझ्यावर ?. ..
**बाई**—आता सागायला का पाहिजे ?
**गणपतराव**—खरेंच का माझ्यावर ?
**बाई**—जा गडे !
**गणपतराव**—मग इतके दिवस....
**बाई**—आपण जर मजकडे मुळीं ढुंकूनच पाहानात....
**गणपतराव**—मला तरी काय बरें ठाऊक....
**बाई**—रात्रंदिवस आपली....
**गणपतराव**—इतकें का तुझें माझ्यावर... ?
**बाई**—पण आपलें मात्र....
**गणपतराव**—खरें जर विचारशील तर तुजकडे....माझा ओढा....
**बाई**—मला वाटलें आपलें प्रेम....बायकोवरच....
**गणपतराव**—एः ! ती कसली आली आहे !
**बाई**—हंः !
**गणपतराव**—तो कोठें, बाहेर....
**बाई**—हो, आणि आतां....लवकर नाहीं यायचे....

**गणपतराव**—वा ! मग काय....( उठून दार लावून आंतून कडी लावतो, व तिच्याजवळ जातो ) अगदी खरें ना ?

**बाई**—अगदीं खरें !

**गणपतराव**—मग आतां....[ असें म्हणून तिला आलिंगन द्यायला जातो, तोंच दाराची कडी आपोआप निघून दार उघडलें जातें, व दोघेजण आंत येतात. बाई नाहींशी होते. ]

**पहिला**—पाजी माणूस ! .. लाज नाही वाटत ?

**दुसरा**—पाहतोस काय ! लाथ मारून. ..

**पहिला**—लाथ कशाला ...चांगला जोडाच ..(फडाफड मारतो.)

**गणपतराव**—( थरथर कांपत व रडत ) नको !

**दुसरा**—नको कसें ? स्नेही म्हणवतोस

**पहिला**—मला तर चांगला सज्जन...

**दुसरा**—सज्जन कशाचा ! बदमाश .

**पहिला**—मोठा अभिमान....

**गणपतराव**—( रडत ) आतां नाहीं !

**दुसरा**—नाहीं कसें ! लगाव आणखी. .

**पहिला**—शरम नाहीं ! ( आणखी गणपतरावांना जोड्यानें फडाफड मारतो. ) चल नीघ....!

**गणपतराव**—( रडत ) जातों ! ...पण दार कुठें आहे ! ( दार सांपडत नाहीं. इकडे तिकडे धावूं लागतो. आणखी पुष्कळ माणसें धांवून येतात व सगळेजण जोडे मारूं लागतात. अंधार पडतो व खोली दिसेनाशी होते, पण सारखे जोडे बसत असल्याचा भास होतो. ) दारच सांपडत नाहीं ! हाय !....

---

## प्रवेश पांचवा

[ **स्थळ**—गणपतरावाची खोली, पण ती त्याना स्वप्नात दिसत आहे. टेबलावर दिवा लावलेला आहे. स्वप्नातील गणपतराव घाईघाईनें आत येऊन सतरंजीवर मट्कन् खालीं बसतो. ]

**गणपतराव**—खिडक्या लावलेल्याच आहेत ना ?.... नाहींतर आंत येऊन आणखी मला....करूं तरी काय आतां ! ( रडूं लागतो ) ....प्रत्यक्ष स्नेहाच्या बायकोशीं....गेलें ! इतक्या दिवसांचें चांगलें आयुष्य पार ! ( मोठमोठ्यानें स्फुंदूं लागतो. )....आतां ?....आतां मी जाऊं तरी कुठें ?... गोविंदरावाकडेसुद्धा ? .. छे ! तिथेंसुद्धा नाहीं ! इतक्या वर्षांचा स्नेह, पण....त्याच्यापुढें जाऊं तरी कसा ? मनाचें पावित्र्य ! माझ्या मनाचा जोर !....( स्फुंदत ) कुठें आहे आतां !.... जगांतील प्रत्येक वस्तु 'या, जोडेखाऊ ! या जोडेखाऊ !' म्हणून ( खालीं डोकें टेकून अधिकच स्फुंदूं लागतो. )....अण्णा !....अण्णा ! ....पण त्यांना तरी हें काळें तोंड... ( दोन्ही हातांनीं तोंड झांकून मोठमोठ्यानें रडूं लागतो. ) विनूला नांवें ठेविलीं, आणि मी ?.... जगांत डोळे उघडून मी !....मी आतां पाहूं तरी कसा ! ( पुनः रडूं लागतो. ). ..चला अफू खाऊन जीवच....( उठतो व टेबलाचा खण ओढून एक लहानशी डबी घेतो. त्यांतील अफू घेऊन हातावर ठेवतो. ) हो ! खावीच....नाहीं, खायलाच पाहिजे आता !....रडून काय उपयोग !....देवा ! नुसत्या रडण्यानें जर झालेल्या गोष्टी न झालेल्या होत्या, तर किती....किती चांगलें....!

[ इतक्यात पाढरी व काळी आकृति आत येते. पाढरी आकृति गणपतरावाजवळ जाऊन उभी राहते व काळी आकृति कोपऱ्यात उभी राहते. ]

**गणपतराव**—( घाबरून ) कोण तूं ?

**पांढरी आकृति**—मी तुला....

**गणपतराव**—( काळ्या आकृतीकडे पाहून ) आणि तो ?

**पांढरी आकृति**—पुनः सांगतों....

**गणपतराव**—काय ?....

**पांढरी आकृति**—नरकांतील दूत....

**गणपतराव**—आणि स्वर्गांतील....?

**पांढरी आकृति**—दोन्हीही....अगदीं जवळ....सारखे टपून....

**गणपतराव**—( घाबरून ) पण मी अफू ..

**पांढरी आकृति**—नाहीं, हें स्वप्न ..

**गणपतराव**—काय ! हें स्वप्न !... हें स्वप्न ! !....

**पांढरी आकृति**—होय ! तुला आधीं सावध करण्याकरितां ..

**गणपतराव**—स्वप्न !

**पांढरी आकृति**—ध्यानांत ठेव....ऐट नको करूंस....मनांतल्या मनांतसुद्धा....

[ काळी आकृति नाहींशी होते. खोलीला कप सुटून, ती नाहींशी होते. अत्यंत तेजस्वी असा पाढरा स्वच्छ प्रकाश पडत जातो. पाढरी आकृति मोठी व उंचच उच होत जाऊन, लाबवर जटा सोडलेली, कपाळाला भस्म लावलेली व गळ्यात रुद्राक्षाच्या, फुलाच्या वगैरेंच्या माळा घातलेली, अत्यत रेखीव व तेजःपुज अशी दिसू लागते. आकृति गणपतरावाकडे पहात पहात आपलें तोंड त्याच्या तोंडाजवळ नेऊ लागते, तोंच—]

---

*

## प्रवेश सहावा.

[**गणपतराव** घाबरून व घामाघूम होऊन 'राम !' असें म्हणून बिछान्यावर चट्‌कन् उठून बसतो.]

**गणपतराव**--हुश्श् ! किती विलक्षण स्वप्न ! ( थांबून ) पण तें स्वप्नच होतें, हें किती चांगलें झालें ! नाहींतर तेंच खरें असतें--( थाबून ) पण, खरोखरच मी जागा झालों आहे ना ? नाहींतर--( आसपास नीट दोन तीन वेळा पाहून ) उठाच आतां. त्याशिवाय नाहीं खात्री व्हायची, [ इतक्यात कोणीतरी कोमल आवाजानें 'राम आकाशीं पाताळीं ! राम नादे भूमंडळीं ॥' म्हणत असल्याचें ऐकूं येतें. ] अऽ ( उठून पलीकडील खिडकी उघडतो, तोंच अरुणोदयाचा प्रकाश त्याच्या तोंडावर व सर्वांगावर पडतो. क्षणभर पहात उभा राहातो, इतक्यात घण्घण् घण्घण् असा घंटानाद ऐकूं येतो. 'राम नित्य निरंतरीं। राम स-बाह्य-अभ्यंतरीं ॥' असे पुन. भूपाळीचे कर्णमधुर शब्द ऐकू येतात. ) खरें आहे ! ( थाबून ) मघाचें तें स्वप्नच,--आणि हें देऊळ-हें शिखर-हें आकाश किती पवित्र ! ( डोळे मिटतो. तोंच डोळ्यातून अश्रुधारा येतात ) छातींत कसें धडधडतें आहे ! ( डोळे पुसूं लागतो ) पण हें परमेश्वराचें धडधडणें, ( पुन. डोळे भरून येतात. ) आणि हे अश्रु---!

लेखन ता. २१ डिसेंबर १९१५ प्रकाशन, 'रत्नाकर' जानेवारी १९२८



# कारकून.

— ० —

( लेखक—'दिवाकर' )

'कारकून' नाटकाचा प्रथम प्रयोग मुक्काम पुणे येथे किर्लोस्कर नाटक-गृहात रा० देवल याच्या 'फाल्गुनराव' नाटकानतर महाराष्ट्र नाटक मडळीनें तारीख २६ माहे जून सन १९२३ रोजीं रात्रौ करून दाखविला. प्रथम प्रयोगात ज्यानीं कामे केलीं त्याचीं नावेः —

| | | |
|---|---|---|
| दिनकरपंत | रा० | केशव त्र्यबक दाते. |
| नानासाहेब | ,, | गणेश कृष्ण बोडस. |
| अप्पासाहेब | ,, | वामन कृष्ण दातार. |
| गोविंदराव | ,, | दत्तात्रेय पाडुरग डोगरे. |
| केशवराव | ,, | विश्वनाथ हरि आटवले. |
| पट्टेवाला नं. १ | ,, | भाऊ केशव सहस्त्रबुद्धे. |
| डॉ० स्टिट्ग्मन् | ,, | दत्तात्रेय नरहर वैशपायन. |
| हणमंतराव | ,, | प्रल्हाद रामचद्र जोशी |
| गोपाळराव | ,, | बाबू सखाराम पेटकर. |
| अनतराव | ,, | गोपाळ कृष्ण ओक. |
| पट्टेवाला नं २ | ,, | परशुराम मुकुंद शाळिग्राम. |
| यमुनाबाई | ,, | सिताराम दिनकर जोशी. |
| सुंदराबाई | ,, | विष्णु हरि औधकर. |
| सखाराम | ,, | दत्तात्रेय मार्तड कुलकर्णी. |
| पोलिस शिपाई | ,, | पाडुरग वामन जोशी. |



# कारकून

## अंक पहिला

[ **स्थळः**—सरकारी कचेरी. एक मोठी खोली. चार कारकून काम करीत बसले आहेत. उजव्या हाताशी असलेल्या खोलींतून टाइपरायटर्स्चा आवाज ऐकूं येत आहे. पाठीमागच्या बाजूस एक मोठा दिवाणखाना असून त्यातही बरेचसे कारकून काम करीत बसले आहेत. मधूनमधून पट्टेवाले वेताच्या टोपल्यात कागद घेऊन व मध्येंच 'सा ऽऽ ब!' असे ओरडत इकडून तिकडे धावत आहेत. लांबवर कोणीतरी टेलिफोन्वर बोलत आहे असें वाटतें. खोलीच्या डाव्या हाताकडे दुसरी एक खोली असून तिचें दार अर्धवट उघडें आहे. दारावरच किंचित् वरच्या बाजूला 'रेकॉर्ड्' अशी डोळे वटारून बघणारी पाटी दिसत आहे.]

[पात्रेः—**केशवराव, गोविंदराव,** दिनकरपंत, कारकून, **अप्पासाहेबः** एक जुने व अनुभवी कारकून. **नानासाहेबः** सर कारकून. ]

[ कालः—१९०८ ते १९१५ या सालातील कोणतेंही वर्ष. ]

**केशवराव**—( जांभई देऊन हातातील कागदाने वारा घेत घेत ) आ–य आई! छे बोवा! काय भयकर उन्हाळा हो!

**गोविंदराव**—कांहीं विचारूं नकोस! सारख्या डोक्यातून अन् अगातून घामाच्या धारा चालल्या आहेत! हुश्श! हा, हा, हा!

**केशवराव**—नाहीं–पण यंदाचा उन्हाळा जरा जास्तच–

**गोविंदराव**--अरे चालायचेंच दिवसेंदिवस उन्हाळा आता जास्तच कडक येत जायचा. कारण-

**अप्पासाहेब**---डॅम् ! कोठलीं निब्स् आणलीं आहेत कोणाला ठाऊक! नागर जसे कांहीं !

**केशवराव**--अहो, नागरच नाहीं तर काय ! अक्षरसुद्धा धड येत नाहीं ! भीक लागली आहे डिपार्टमेंटला, तेव्हा हें असलें कांहीं तरी आपल्या गळयात ( लगबगीनें अप्पासाहेबाजवळ जाऊन ) अप्पासाहेब, हें पहा बरें, निब् कसें काय चालतें तें !

**अप्पासाहेब**---( पहिलें निब् फेंकून देऊन दुसरे लावतो व लिहूं लागतो ) आहे ! फक्कड आहे !

**केशवराव**--( हंसत ) हेः हेंः, हे आपलें माझे खासगी आहे हो ! ( आपल्या जागेवर जाऊन बसतो व काम करू लागतो. )

**गोविंदराव** --( आपल्याशीं ) हो हो, असायचेंच तें ! असा खासगी कारभार केल्याशिवाय झोंपा कशा ताणायला सापडतील हपिसात ! चोर लेकाचा !

**आप्पासाहेब**---अरे केशवराव, कोण म्हणालास तू कोंकणातून कोण आलें आहे ! आत्या का तुझी !

**केशवराव**---साहेब, आत्या नाहीं. मावशी आली काल माझी !

**अप्पासाहेब**---फणस मोठा छान निघाला बोवा तुझा !

**केशवराव**---(हंसत) हेंः हेंः नानासाहेबही तेंच म्हणत होते. उठल्याबरोबर सकाळीं दुसरें तिसरें कांहीं केलें नाहीं ! नानासाहेबाकडे जाऊन तिथें एक फणस ठेवला, आणि लगेच तडक आपल्याकडे---

**गोविंदराव**---(आपल्याशीं) पहा, लेकाच्याचें कसें खासगी आहे तें !

**पट्टेवाला**---( आंत येऊन ) हं, दिनकरपंत हें स्टेट्मेंट् घ्या. नानासाहेबानीं सांगितलें आहे कीं, हें आजच्या आज तयार होऊन मिळायला पाहिजे ! समजलें का !

**दिनकरपंत**---अहो, पण हें आजच्या आज होणार कसें !

**पट्टेवाला**—तें मला नाहीं ठाऊक! नानासाहेबांनीं सांगितलें कीं, आजच्या आज—

**दिनकरपंत**—आधींच काम किती पडलें आहे, आणखी—

**पट्टेवाला**—ही कुरकुर माझ्याजवळ का? साहेबानीं सांगितलें. मी आणून दिलें. करा, नाहीं तर तिकडे फेकून द्या! [ निघून जातो ].

**गोविंदराव**—( दिनकरपंताच्या टेबलावरील कागदाच्या भाऱ्याकडे व खुद्द दिनकरपंताकडे पाहून थोड्या वेळानें ) खरेंच, काम बाकी पुष्कळच पडलें आहे! आणि स्टेट्‌मेंट्‌हि कांहीं लहान सहान दिसत नाहीं!

**केशवराव**—अहो, तुम्हाला ठाऊक नाहीं पंतांचें! अक्षर चांगलें आहे, अन् ते काम फार काळजीपूर्वक करतात, म्हणून साहेबाची त्यांच्यावर इतकी मर्जी आहे! आपल्यासारखें थोडेंच आहे! बोलून चालून आळशी माणसें!

**गोविंदराव**—हं:, चांगली मर्जी आहे अन् काय! एखाद्याचें अक्षर चांगलें आहे, अन् तो काळजीनें काम करतो, म्हणून उगीच त्याच्यावर वरच्यावर कामाचा बोजा लादणें, ही छान तुमची मर्जी आहे बुवा!

**केशवराव**—अरे अजून रुळले नाहींत ते! येऊं दे. एकदा अनुभव येऊं दे म्हणजे आपसूखच ताळ्यावर येतील.

**गोविंदराव**—तें कसें?

**केशवराव**—अरे तर, नोकरी म्हटली कीं, आपण होऊन जीव तोडून उगीच भरधाव धावूं नये, हें कळलें नाहीं त्यांना अजून! मी म्हणतों, केलें–छाती फुटेपर्यंत काम केलें! फायदा काय? पैशाच्या नावानें तर बाजा!

**गोविंदराव**—अरे अमळ हळू बोल! तो काकोबा तुझें ऐकेल ना! हः, केव्हाचा तो एक कागद घेऊन बसले आहेत!

**केशवराव**—मजा आहे अन् काय! जाऊं दे। आपल्याला काय करायचें आहे त्याच्याशीं? ( बरेचसे कागद टेबलावर इकडे तिकडे पसरून ) आता कांहीं तरी काम करायला पाहिजे! नाहीं तर आपल्याही गळ्यात एखादें घोंगडें यायचें!

**गोविंदराव**—( दिनकरपंताकडे पहात आपल्याशीं ) सारखें खालीं मान घालून काम करतो आहे ! जरा अमळ मदत करू का ?—पण नको ! आज एकदा मदत केली, तर रोज उठून कटकट लागायची पाठीमागे ! आणि ' तुला काम कमी ! ' म्हणून आणखी एखाद्या उडाणटप्पूचे काम बसायचे टाळक्यावर ! तेव्हा नकोच तें ! ( काम करू लागतो. )

**दिनकरपंत**—( घड्याळाकडे पहातो. )

**केशवराव**—काय पंत, घड्याळाकडेसे पहाता आहे ?

**दिनकरपंत**—काहीं नाहीं, सहज किती वाजले ते पाहिले. ( आपल्याशी ) साडेपाच तर आताच झाले. आठाच्या आत कांहीं आज घरीं जायला सापडत नाहीं ! ( थांबून ) रोजचेंच आहे ! आणि घरीं ..घरीं तर—चूप ! आता उगीच गडबड करु नकोस !

**अप्पासाहेब**—( काहीं वेळानें ) साहेब गेले का हो ?

**केशवराव**—हो केव्हाच ! ते तर साडेचारालाच गेले ! कामात होता आपण, म्हणून आपल्याला समजले नाहीं ! अप्पासाहेब, सहा वाजायला आले !

**अप्पासाहेब**—येऊ दे रे ! पण हो, आज तुम्हाला एक आनंदाची बातमी समजली का ?

**केशवराव**—ह्यः ! ह्य ! ती कोणती, अप्पासाहेब ?

**अप्पासाहेब**—काय, ठाऊक नाहीं ? काय गोविंदराव, तुम्हाला काहीं सुगावा ?

**गोविंदराव**—नाही बोवा, काहींच समजलें नाहीं मला !

**केशवराव**—अहो, नाहींतर आमच्या पंताना ठाऊक असेल. काय पंत ?

**अप्पासाहेब**—अरे त्याला कोठले ठाऊक असायला ! साहेबाना आपल्या प्रमोशन झाले ! समजलें का !

**केशवराव**—अस्से ! पण ते किती ?

**अप्पासाहेब**—किती म्हणजे ? बाराशेचे आठराशे आणि शिवाय भत्ता !

**गोविंदराव**—चैन झाली अन् काय !

**अप्पासाहेब**—बाकी साहेब आपला हुशार माणूस म्हणा !

**केशवराव**—हो तर ! यात काय संशय ! अहो तें...मागें नाहीं ! त्या भत्तेबिलाच्या बाबतींत अकौटंट् जनरल्ला ऐसा टरकावला कीं, ज्याचें नाव ते ! याला म्हणावें लेखणी ! नाहीं तर आम्हीं ! बसलों आहोत दळीत ! ( दिनकरपताखेरीज सर्वजण हसतात ).

**केशवराव**—( दिनकरपताकडे रोखून पहात ) प...ण काहो अप्पा-साहेब, आमच्या पताना नाहीं का काहीं मिळालें ! ते तर कवी आहेत !

**दिनकरपंत**—काय, काहीं तरी बडबडता हो !

**केशवराव**—अरे वा ! मोठें चमत्कारिकच दिसता ! काय बडबडलों हो !

**गोविंदराव**—श्शूक ! गप बसा-नानासाहेब आले.

**केशवराव**—येईनात आले तर ! काहीं अक्कल आहे की नाहीं !

**दिनकरपंत**—चूप रहा !

**नानासाहेब**—( आत येऊन ) सायलेन्स् ! काय गडबड आहे ! अप्पासाहेब, अहो, हें डायरेक्टर् जनरल्चे प्रकरण इनस्पेक्टर् जनरल्कडे काय म्हणून गेले !

**अप्पासाहेब**—पाहू, पाहूं बरें. ( प्रकरण हातात घेऊन पहातो ).

**नानासाहेब**—अहो, साहेब किती ओरडत होते ! काम नीट होत नाहीं अन् काहीं नाहीं, हपीसात सगळा गोंधळ माजला आहे म्हणून ! हें काय हे !

**अप्पासाहेब**—ह, आता आलें लक्षात. दिनकरपंत, इकडे या पाहू.

**नानासाहेब**—कोणाची ! याचीच चूक का !

**आप्पासाहेब**—हो,-तुम्ही हें प्रकरण डि. जी. कडे पाठवायचें सोडून आय्. जी. कडे काय म्हणून पाठविलेंत !

**दिनकरपंत**—( प्रकरण पाहून ) साहेब, आपण पत्ता तर हा आय्. जी. चा—

**नानासाहेब**—अहो, नुसते पत्त्याचें काय घेऊन बसला आहात !

मजकूर नको का वाचून पाहायला ! असें कसें डिस्पॅच् करता तुम्ही ! डोळे उघडे ठेऊन काम करता का झोप घेता !

**आप्पासाहेब**—( कागद टेबलावर ठेवून त्यावर काहीं लिहूं लागतो ).

**गोविंदराव**—( आपल्याशीं ) आहे कीं नाही ! घसरले अप्पासाहेब ! नानासाहेबांनीं लक्ष दिलें नाहीं, साहेबानीं पाहिलें नाहीं ! अन् उट्टें निघतें आहे त्याचें दिनकरपतावर ! खासा न्याय !

**अप्पासाहेब**—( प्रकरण दिनकरपताच्या हातात देऊन ) जा ! पुनः अशी चूक करूं नका. नीट केअरफुली–काळजीनें–काम करीत जा–समजलें !

**केशवराव**—( दिनकरपताकडे पाहून ) आधीं तें स्टेट्मेंट् तयार करा आणि मग–

**नानासाहेब**—काय ! तें अजून तयार झालें नाहीं ! शाबास !

**दिनकरपंत**—साहेब–

**नानासाहेब**—काय, साहेब काय ! आजच्या आज तयार व्हायला पाहिजे, असे सागून पाठविले होतें, आणि तुम्ही तर–काहो अप्पासाहेब, तुम्ही तर याची मोठी शिफारस केली होती, कीं, हे फार कळकळीनें काम करणारे आहेत म्हणून ! पण हे तर अगदीं सुस्त दिसतात ! तें काहीं नाहीं ! आताच्या आता तें स्टेट्मेंट् तयार होऊन साहेबाच्या बंगल्यावर रवाना झालेंच पाहिजे !

**दिनकरपंत**—साहेब, अजून टपालच किती–( अप्पासाहेब डोळ्यानें खुणावतात.)

**नानासाहेब**—काय ! टपालही अजून शिल्लकच ! हपीसांत भांडणें करा, ( केशवरावाकडे नजर टाकून दिनकरपंतास ) नाहीं तर कविता खरडा, म्हणजे छान काम लौकर होईल !

**दिनकरपंत**—पण साहेब–

**नानासाहेब**—( उसळून ) वर तोंड करून बोलता आणखी ! दिनकरपंत, तुम्हाला अजून कायम व्हायचें आहे, लक्षांत ठेवा

**केशवराव**—( आपल्याशीं ) खाशी-छान झाली !

**पट्टेवाला**—( आत येऊन ) साहेब, बाहेर टांगा उभा आहे.

**नानासाहेब**—अरे हो, खरेंच कीं ! चला अप्पासाहेब, येता का ?

**अप्पासाहेब**—हो, हो, चला कीं ! माझी तयारी आहे. दिनकरपंत, आजच्या आज सगळें टपाल, आणि तें स्टेट्मेंट् तयार करून, मग घरीं जा बरें.

**नानासाहेब**—काम पाहिले तर काहीं नाहीं, पण गोंधळ किती ! का हो अप्पासाहेब, आपल्या वेळेला तर याच्या तिप्पट काम होतें !

**अप्पासाहेब**—ह्यः ! ह्यः ! ह्यः !

**नानासाहेब**—पण काहीं नाहीं ! पाचाच्या आत पार फडशा ! चला, येता ना ? ( जातो. )

**अप्पासाहेब**—हा आलोंच. सुपिरियर्शीं कसें बोलावें हें अजून समजत नाहीं तुम्हाला ! (उपरणें झटकून व हातात छत्री घेऊन) परवाच नानासाहेब म्हणत होते, कीं, सिव्हिल् सर्जन्‌कडे तुम्हाला पाठवावयाचें म्हणून. अन् तुम्ही तर हें असें-केशवराव, जरा त्याना मदत करा हो ( जातो ).

**केशवराव**—होय साहेब. काय दिनकरपंत, पाहू काय काय—

**गोविंदराव**—( सगळे आवरून ठेवून ) चला, आता आपण कशाला उगीच बसा ? ( जाऊ लागतो. )

**केशवराव**—काहो ? निघाला वाटतें ? थाबा, मी येतों ना. (डोक्याला रुमाल बांधू लागतो ) अहो, घरात म्हणजे कोण अडचण ! अन् त्यात आणखी पाहुण्याची भर ! का...य एक एक ( गोविंदरावाबरोबर दाराशीं गेल्यावर दात विचकून व मागें वळून ) पत ! सगळें तें करा आणि मग घरीं जा बरें ! [ दोघेही जातात. ]

**दिनकरपंत**—( थोडा वेळ काम करून आपल्याशीं ) असें वाटतें कीं-स्स् ! ( दात ओठ खातो ) आहाहाहा ! डोकें कसें पेटून गेलें आहे ! ( काम करू लागतो ). जिवा ! तुला अजून कायम व्हायचें आहे, अजून तुला कायम व्हायचें आहे. ( थांबून ) येऊं दे, लागतील तितके अश्रूंचे

लोट येऊं देत ! दुःखाची इतकी आग भडकली आहे, कीं, ते पार कर-पून–हुश्श ! ( काम करू लागतो ) तूं काय समजलास आहेस ? जरूर नाहीं त्या नोकरीची ! ( झटकन् एक कोरा कागद घेऊन त्यावर काहीं लिहूं लागतो ) पण हो, हो, बेटा ! अमळ घराकडे–! ( शून्य दृष्टीने पाहूं लागतो, तो पुनः डोळे भरून येतात व कंठ दाटून येतो.) देवा ! कुठें रे गेल्या त्या जिवाच्या ऊंच ऊंच उडया, आणि त्याचीं ती गोड स्वप्नें !

[ टेबलावर अंग टाकून स्फुंदूं लागतो. वाऱ्यानें दार झटकन् बंद होतें].



# अंक दुसरा.



[ स्थळ—सरकारी जनरल हॉस्पिटल्मधील एक खोली. हिची लांबी रुंदी अदमासे वीस फूट आणि उंची जवळ जवळ पधरा फूट असेल. भिंतींना फिक्कट हिरवा रंग दिलेला आहे. उजव्या हाताशीं असलेल्या भिंतीला दोन मोठ्या खिडक्या आहेत. पण त्यांच्या तावदानाला ज्या कांचा बसविलेल्या आहेत, त्या उजेडाशिवाय पलीकडचें कांहींच दाखवीत नाहींत. समोरच्या भिंतीला दार नाहीं आणि खिडकीही नाहीं. आंत शिरण्याचें दार डाव्या हाताकडील भिंतीला असून तें अलीकडच्या कोपऱ्यात आहे दार चांगलें मोठें असून त्याचीं तावदानेंसुद्धां खिडकी-सारखीच आहेत. या महाद्वाराशिवाय भिंतीला खिडकी वगैरे कांहीं नाहीं. याच भिंतीला लागून दाराच्या पलीकडे सहा फूट लांबीचा एक पाटीचा बांक ठेवलेला आहे. त्याच्या पलीकडे कोपऱ्यात एक लहानसें टेबल आहे. चारपांच औषधाच्या बाटल्या, कांचेच्या लहान लहान नळ्या वगैरे जिनसा त्यावर व्यवस्थित रीतीनें मांडून ठेवल्या आहेत. उजव्या हाताकडील कोपऱ्यात एक वॉशिंग् स्टॅंड् ठेवलेला आहे. मध्यभागीं जें टेबल् दिसत आहे, त्याच्यावर लिहिण्याचें सामान, सरकारी कागदपत्रें व पुस्तकें, तसेंच वैद्यकीय विषयाचे भले मोठे दोनतीन ग्रंथ असें साहित्य मोठ्या टापटिपीनें मांडलेलें आहे. पलीकडे जवळच एक चांगली खुर्ची आहे. वैद्यकीय ज्ञानाच्या भारदस्तपणाला, व तद्विषयक पंडितांच्या गंभीर अभिरुचीला अनुसरून सदहू खोलीमध्ये तसबिरी लावलेल्या नाहींत, इतकेंच नव्हे तर टेबलावर फ्लावरपॉट्मध्यें जो पुष्पगुच्छ ठेवलेला आहे, त्यांत चुकूनसुद्धां सुवासिक फूल आलेलें आढळत नाहीं. समोरच्या भिंतीला डोळे तपासण्याच्या अक्षराचा, व एक ठिपक्याचा असे दोन नकाशे लटकावलेले आहेत.]

[पात्रें—डॉक्टर स्ट्रिंगमन् : असिस्टंट् सिव्हिल् सर्जन्. दिनकरपंत,

**गोविंदराव, गोपाळराव, अनंतराव** : सरकारी कारकून. **हणमंतराव** : हॉस्पिटल्चे कारकून. एक **पोलिसशिपाई** व एक **पट्टेवाला.** ]

**पट्टेवाला**—( आत येऊन ) या इकडे. बसा इथें या बाकावर. कोठून पोष्टखात्याकडून आलात काय ! [ गोविंदराव आत येऊन बिचकत बिचकत बाकावर बसतो. ]

**गोविंदराव**—हो, पोस्टखात्याकडूनच.

**पट्टेवाला**—( टेबलावरील सामान इकडे तिकडे हलवीत व पुनः जागच्या जागीं ठेवीत असता ) तुमचे पाकीट कोठें आहे पाहू !

**गोविंदराव**—काय ! पाकीट !

**पट्टेवाला**—हो पाकीटच ! ऐकायला येत नाहीं वाटतें तुम्हाला नीट! ( गोविंदरावानें दिलेलें पाकीट टेबलावर ठेवून ) असें करून कसें चालेल! एकदम अन्‌फिट् व्हाल ना ! ( टेबलावरील बाटल्यात औषधें आहेत किंवा नाहींत हें पहात असता ) माझ्याशीं बोलताना जर तुमची ही तऱ्हा, तर मग साहेब आल्यावर कसें होईल ! पार घाबरून जाल कीं !

**गोविंदराव**—( किंचित् भीत भीत आसपास एकदा सगळी खोली पाहून ) सिव्हिल् सर्जन् साहेबाची ही हीच खोली वाटतें !

**पट्टेवाला**—नाहीं, नाहीं ! ही नाहीं ! ही असिस्टंट् साहेबाची-आमच्या धाकल्या साहेबाची खोली आहे. थोरल्या साहेबाची पलीकडे आहे.

**गोविंदराव**—अस्सें ! पण...काय हो, डोळे तपासायचा...हा ... हाच—

**पट्टेवाला**—( 'सावज बरें आहे !' अशा अर्थानें मान हालवून ) हो हाच तो कागद, उठा, त्या तिथें उभे रहा पाहू ! जरा...जरा पुढे. ( गोविंदराव सागितल्या ठिकाणीं उभा राहतो ) बस् ! ठेवा डाव्या डोळ्यावर एक हात. ( गोविंदराव डावा डोळा झाकतो ) अन् सागा पाहूं आता हे किती ठिपके आहेत ते !

**गोविंदराव**—( मोजीत ) एक...दोन...

**पट्टेवाला**-अहो, असें मोठ्यानें मोजायचें नाहीं. एकदम सांगा...आता !

गोविंदराव—आठ.

पट्टेवाला—हे ?

गोविंदराव—चा...चार.

पट्टेवाला—अहो असें चाचरत काय सागता ! बरं झाका आतां उजवा डोळा. ( गोविंदराव उजवा डोळा झाकतो ) बोला. हे किती ठिपके ! लवकर !

गोविंदराव--नऊ

पट्टेवाला--अस्स......हे किती !

गोविंदराव--सहा.

पट्टेवाला—( मान हलवीत ) आहे ! फिट् व्हायला कांहीं हरकत नाहीं ! बसा. आता आमचे साहेब येतील.

गोविंदराव--वेळ झाली वाटतें त्याची यायची !

पट्टेवाला--हो, झालीच म्हणायची. बाकी...पाहिले डोळे तुमचे आधीं मीं, म्हणून बरं झालें ! नाहींतर...जाताना मी आपल्याला भेटेनच.

गोविदराव—हो, हो, जरूर !

पट्टेवाला—( दाराशीं जाऊन ) कोण ? कोण आहे, नाईकसाहेब ! ( पोलिस आत डोकावतो, गोविंदराव जरा उठल्यासारखें करतो ) या, या !

पो० शिपाई—( आत येतो. गोविंदरावाकडे पाहून व दाढीवरून हात फिरवून ) हे कोण ! कोणीकडून आले आहेत हे ?

पट्टेवाला—हे का ! काय हो ! तुम्ही पोष्टाकडून आला आहांत नाहीं का ?

गोविंदराव—( अर्धवट उठून ) हो, पोस्टाकडूनच.

पट्टेवाला—क्यँव नाईकसाब, कुच खबरबात ?

पो० शिपाई—अरे क्या खबरबात ? पुछो मत !

पट्टेवाला—ऐसा ! क्या हुवा क्या ?

**पो० शिपाई**—बडा साब आज बहोत गरम झाला होता !

**पट्टेवाला**—हा ! ते काय म्हणून ? अन कोणावर ?

**पो० शिपाई**—परवा तो कलेकटर साहेबाचा कारकून नव्हता आला ?

**पट्टेवाला**—हा, तो चष्मेवाला ?

**पो० शिपाई**—तोच तो. त्याने जो बाबा चष्मा आणला होता, तो निघाला चुकीचा ! अस्सा साहेब त्याच्या अंगावर ओरडला, कीं बेटा पार भेदरूनच गेला !

**पट्टेवाला**—हः ! हः ! बहोत गम्मत हुई ! फीर ?

**पो० शिपाई**—फिर क्या ? दिला त्याला हाकून ! अन अशी ताकीद दिली की, दोन दिवसानी चागला चष्मा आण, नाहींतर अनफिट् करीन !

**पट्टेवाला**—करील बाबा ! थोरला साहेब म्हणजे काय...भारीच कडक ! आग्या वेताळ तो ! अरे परवाचींच गंमत !

**पो० शिपाई**—क्या, क्या हुआ !

**पट्टेवाला**—इथ हपिसात झटकत होतो मी. इतक्यात मेमूसाहेब आल्या, अन् पलीकडच्या हपिसात निरोप पाठवला. लगेच बाबाने सागून पाठवलें, कीं, " कामात आहे, बाहेर उभी रहा !" झालें ! पाच मिनिटे झाली, दहा झालीं, पत्ता नाहीं याचा ! अन् ती तर इकड उभी !

**पो० शिपाई**—ऐसा !

**पट्टेवाला**—आता मेमूसाहेब ती ! तेव्हा इथली एक खुर्ची घेतली, अन् तिला मी बसायला दिली ! ती कुठे खुर्चीवर टेकते न टेकते, अन् मी मागें फिरतो, तो बाबा आला आतून !

**पो० शिपाई**—अरे बापरे !

**पट्टेवाला**—अन् हातपाय आपटून जो माझ्यावर उखडला, अन् म्हणाला, " तुला खुर्ची द्यायला कोणी सागितली ! काम सोडून तूं बाहेर का आलास ? मेमूसाहेबाला उभें राह्यला सागितलें होते, राहिली असती उभी !"

**पो० शिपाई**—क्या जुलूम आहे ! फीर ?

**पट्टेवाला**—फिर क्या ! मेरा नशीब ! अशिस्टट साहेबाना सांगितलें, आणि शिक्षा म्हणून तासभर मला उन्हात उभें केलें !

( दोघेहि मोठ्यानें हसतात )

**पो० शिपाई**—बहोत कडक ! बडासाब बहोत कडक !

**गोविंदराव**—( अदबीनें ) कोण ! सिव्हिल् सर्जन् वाटतें !

**पो० शिपाई**—क्या ! सिव्हिल् सर्जन् क्यँव बोलता आहे ! बडा-साब बोलो !

**गोपाळराव व अनंतराव**—(एकदम आंत येऊन) हेंच अशिस्टंट—

**पट्टेवाला**—हो, हेंच अशिस्टंड् साहेबाचें हपीस ! पण तुम्ही एकदम आंत कसे शिरलात ! आधीं विचारल्याशिवाय ! बसा त्या बाकावर ! (गोपाळराव व अनंतराव बाकावर बसतात तोंच) तुमचीं पाकिटें आणा पाहूं !

**पो० शिपाई**—कुठून आलात तुम्हीं ! ( पट्टेवाला पाकिटें टेबलावर ठेवतो. )

**गोपाळराव**—फॉरेस्ट् डिपार्टमेंट्.

**पो० शिपाई**—फारीष्ट !

[ हणमतराव व दिनकरपंत आत येतात. बाकावर बसलेले तिघेजण उभे राहतात व लगेच खालीं बसतात.]

**हणमंतराव**—पण तुम्ही इतके उशीरा का आलात ! आता साहेब येतील.

**दिनकरपत**—घरीं मुलगा फार आजारी—

**हणमतराव**—( टेबलावर दिनकरपताचें पाकीट आपटून ) तें खरें ! पण हें सरकारी काम आहे ना ! साहेब तुम्हाला पहिल्यानें तपासणार आहेत—बसा त्या बाकावर. ( दिनकरपत बाकावर बसतो. ठण्ठण् असे मोठ्यानें घड्याळाचे ठोके पडतात.) अरे, आठ वाजले. साहेब आत्ता येतील.

[ पट्टेवाला व शिपाई आपले कपडे झाडून नीट ताठ उभे राहतात. बाकावर बसलेली मंडळी नीट सावरून बसतात. सगळेजण दरवाज्याकडे

पहातात. इतक्यात मोटारीचे शिंग वाजतें. पट्टेवाला बाहेर धावतो. पोलिस शिपाई दाराकडे पाहून हळूंच ' साब आया ! ' असें म्हणतो. इतक्यात बुटाचा आवाज होतो; सर्वजण उभे राहतात. स्ट्रिंगमन् साहेब व पट्टेवाला आत येतात. सर्वजण साहेबाना सलाम करतात, व उभेच राहतात. साहेब खुर्चीवर बसतात. ]

**स्ट्रिंगमन्**—(टेबलावरील पाकिटे फोडून ती वाचल्यावर वर पाहून) आज काय चार माणसें तपासायचीं आहेत ? ( पुन्हा कागदाकडे पाहूं लागतो. )

**हणमंतराव**—होय साहेब. चार—

**स्ट्रिंगमन्**—नो ! मला आज इतका वेळ नाहीं. पोटाचें तें ऑपरेशन् करावयाचे आहे, तर...डिनकर कोण आहे ?

**हणमंतराव**—डिनकर कोण तुम्ही का ? हे डिनकर (बोटानें दाखवतो).

**स्ट्रिंगमन्**—मी फक्त आज याच माणसाला पाहीन. बाकीच्याना उद्या यायला साग–( दुसरे कागद पाहू लागतो व मधून मधून लिहितो.)

**हणमंतराव**—( गोविंदराव, गोपाळराव व अनंतराव यास ) आज साहेबाना वेळ नाही. उद्या तुम्ही पुनः या. दिनकरपंत, तुम्ही जाऊ नका. तुम्ही बसा

**गोपाळराव**—उद्या किती...आठाच्या सुमाराला ना ? (जाऊ लागतात )

[illegible]—नो नो ! बरोबर साताला या ! ( तिघेजण जातात. )

[illegible]पाय !

[illegible] ( सलाम करून ) साऽब !

[illegible]—हे [illegible]ाकीट बडा साबकू देव और सलाम बोलो.

[illegible]पाई—अच्छा साब. ( जातो. )

**स्ट्रिंग्मन्**–डावा हात अधू असलेल्या माणसाचा अनफिट् कागद पाठविला ?

**हणमंतराव**—होय साहेब, कालच पाठविला. ( आपल्याशीं ) तो तर तसाच विसरून राहिला वाटतें त्या खणात !

**स्ट्रिंग्मन्**—गेट् अप् ! (खिशातून ठिपक्याचे कागद काढतो, व समोरच्या भिंतीजवळ जाऊन उभा रहातो. )

**हणमंतराव**—( दिनकरपतास ) ह, या इथं उभे रहा. ( दिनकरपंताचा डावा डोळा झाकून ) सागा किती ठिपके-- !

**स्ट्रिंग्‌मन्**—( कार्ड् दाखवून ) किती !

**दिनकरपंत**—( मनात ) बरोबर दिसत नाहीं ! ( उघड ) चार.

**स्ट्रिंग्‌मन्**—( दुसरें कार्ड् दाखवून ) हे किती ?

**दिनकरपत**—पाच.

**स्ट्रिंग्‌मन्**—ऑल् राइट्! आता डावा डोळा. ( हणमतराव दिनकरपंताचा उजवा डोळा झाकतो. )

**हणमंतराव**—( दिनकरपतास ) ह, सागा नीट.

**स्ट्रिंग्‌मन्** —( कार्ड् दाखवून ) हे किती ?

**दिनकरपंत**—( मनात ) अरे ! यानेंही -( उघड ) तीन

**स्ट्रिंग्‌मन्**—( दुसरे कार्ड् दाखवून ) हे किती ?

**दिनकरपंत**—सहा. ( साहेब खुर्चीवर जाऊन ब...

**पट्टेवाला**—स्वारी डोळ्यात तर गचकली !

**स्ट्रिंग्‌मन्** –( दिनकरपतास ) इकडे या. तुम्हाला बरोबर दिसत नाहीं. ह...गात किती दिवस काम करीत आहा !

**दिनकरपंत**—साहेब, दोन वर्षे झालीं जवळ जवळ.

**स्ट्रिंग्‌मन्**—अन् तुम्हाला तर दिसत नाहीं ! मग काम कसे करता !

**दिनकरपंत**—तसेच !

**स्ट्रिंग्‌मन्**—पाहू ! ( दिनकरपंताचे डोळे काहीं वेळ पाहून ) अच्छा ! कपडे खोलो.

**हणमंतराव**—अंगातले कपडे काढा. [ दिनकरपत अगातले कपडे काढून बाकावर ठेवतो. ]

**स्ट्रिंग्‌मन्**—( छाती ठोकून पहातो. छातीला नळी लावून काहीं वेळानें.) व्हेरि बॅड्...बोहोत खराब ! ( पोट दाबून पहातो ) उः ! हें काय! स्प्लीन ! जाव ( खुर्चीवर जाऊन बसतो व कागदावर लिहू लागतो.)

**हणमंतराव**—तुम्ही कपडे घाला.

दिनकरपंत—( कपडे घालीत असतां मनांत ) मी कुठें आहे ! ( शून्यदृष्टीनें पाहूं लागतो. )

स्टिंग्मन्—( लिहिलेला कागद हणमतरावाजवळ देतो व एका मोठ्या पुस्तकात नोंद केलेल्या ठिकाणीं बोटानें दाखवून ) इथें त्याचा आगठा घे, अन् त्याला जाऊ दे. (दुसरे कागद वाचीत असतां मनांत ) अलीकडे काय असें व्हायला लागलें आहे कुणास ठाऊक ! खराब प्रकृतिचींच माणसें फार !

हणमंतराव—( कागद हातात घेऊन दिनकरपतास) या इकडे पाहूं. इथें तुमचा आगठा उठवा.

दिनकरपंत—( उजव्या हाताचा आगठा पुढें करतो. )

हणमंतराव व पट्टेवाला—उजवा नाहीं, डावा !

दिनकरपंत—( डाव्या हाताचा आगठा शाईवर दाबून तो सागितलेल्या ठिकाणीं उठवू लागतो )

हणमंतराव—तुमचा हात किती कापतो आहे ! सावकास.

स्टिंग्मन्—( दिनकरपंताकडे पाहून मनांत) पूअर् मॅन् ! [ जातो.

दिनकरपंत—(आगठा उठवून तसाच हात पुढें करून उभा राहतो.)

हणमंतराव—( दिनकरपतास ) नाहीं, तुम्ही नाहीं द्यायचा. इथून रवाना होईल तो कागद.

दिनकरपंत—( पुस्तकाकडे पाहून आपल्याशीं ) आटपला बाजार ! मरेंमरेपर्यंत अभ्यास केला, छाती फुटेपर्यंत काम केलें ! देवा ! आता मी कुठें- ! बाहेर ! बाहेर ! इथें नाहीं !

हणमंतराव—हं, जा आता घरीं. [ दिनकरपंत छत्री घेऊन जातो. ] ( एक कागद मोठ्या पाकिटात घालतो, व वर पट्टेवाल्याकडे पहातो ).

पट्टेवाला—काय झालें साहेब !

हणमंतराव—व्हायचें काय ! अन्फिट् झाला अन् काय !

पट्टेवाला—हंः ! हंः ! हंः !

हणमंतराव—बरें, हें पुस्तक घेऊन चल माझ्याबरोबर.

[ दोघेही जातात. ]

---

# अंक तिसरा

—:o:—

[ स्थळ:—दिनकरपंताचें बिऱ्हाड. त्यांची उठण्याबसण्याची व निजण्याची दोन खणाची खोली. तिच्या पाठीमागें एकदोन खणी स्वयंपाक घर. अधार असल्यामुळें त्यातलें फारसें दिसत नाहीं. पण राखेनें दडपून टाकलेला चुलींतील विस्तव मधून मधून मोठ्या कष्टानें डोकावत आहे। रात्र एकसारखी ओरडत आहे. दिनकरपंताच्या खोलींत एक राकेलचे डबडें धूर ओकीत एका कोपऱ्यात बसलेलें आहे जवळच एक घडवची आहे. तिच्यावर धान्याचे डबे वगैरे पुष्कळच सामानसुमान खचलेलें आहे. भिंतीना जागजागीं खिळे ठोकलेले असून त्यावर मुलाचे अर्धवट फाटलेले कपडे, मळक्या व फाटलेल्या टोप्या, एक दोन जुनेरीं लुगडीं, वगैरे पाघरुणें, चिरगुटें कशीं तरी जुलमानें अडकवून ठेवलेलीं आहेत. जमिनीवर मध्यभागीं फाटलेल्या दारिद्र्यात गुरफटून तीन माणसें निजलेलीं आहेत. दिनकरपताची बायको यमुनाबाई ही जवळजवळ तेवीस वर्षांची आहे. तिच्या उजव्या हाताला जवळच सखाराम नावाचा सातआठ वर्षांचा मुलगा तापानें कण्हत व मधूनमधून बडबडत पडलेला असून त्याच्या उशाशीं एक दोन औषधांच्या बाटल्या व पुड्या पडलेल्या आहेत. धाकटा मुलगा त्र्यंबक हा चार पांच वर्षांचा असून आपल्या आईजवळच डाव्या बाजूला निजलेला आहे. खोलीला वरच्या बाजूस पटई वगैरे काहीं नाहीं; नुसतेंच कौलारू छप्पर आहे. दिनकरपताचे हें बिऱ्हाड एका मोठ्या वाड्याच्या मागच्या आवारात असून, जमिनीला थंडीशी ओल आहे. आत शिरण्याचें दार उजव्या हाताकडच्या भिंतीला दिसतच आहे.]

[पात्रें:—यमुनाबाई:—दिनकरपंताची बायको. सखाराम व त्र्यंबक त्याचीं मुलें. सुंदराबाई:—घराची मालकीण.]

**सुंदराबाई**—( आतून ) हा कोण मेला रोज उठून कहार ! बायकोला आपल्या ताकीद करा ! रोज उठून तुम्हाला कडग्या काढाव्या कोणी !

**दिनकरपंत**—( आतून ) रोज कधीं बर काढता तुम्ही ! आजच कुठे जरा उशीर—

**सुंदराबाई**—( आतून ) अहो, म्हणून काय झालें ! रोजचा तुमचा हाका मारण्याचा सपाटा असतोच कीं नाहीं ! झोपमोड नाही होत लोकाची!

**दिनकरपंतः**—( आतून ) बरं, मी आज.. ...

**यमुनाबाई**—अगबाई ! आले वाटते ! ( दाराची कडी काढते.)

**सुंदराबाई**—( आतून ) मेली झोप का काय ही ! यमुनाबाई !

**यमुनाबाई**—आले हो. ( जाते.)

[ दिनकरपत आत येतात, व कपडे काढू लागतात.]

**सुंदराबाई**—( आतून ) शभरदा सागितल की, रोजचा हा तुमचा ताप नको म्हणून ! राह्यच असेल तर नीट रहावं, नाहींतर खुशाल दुसरीकडे सोय करावी. आम्हाला नाहीं खपायचे हे ! सागून ठेवते !

**यमुनाबाई**—( आतून ) अहो, पण आता या वेळेला तरी–घरात मूल आजारी आहे !

**सुंदराबाई** –( आतून ) बर झाल आहे तर !

**यमुनाबाई**—( घरात येऊन ) रोज उठून मेल तेच !

**दिनकरपंत**—अग चालायचेच ! आपले ऐकून घ्यावे झाले.

**यमुनाबाई**— ऐकून काय घ्याव ? सगळी माणस वाड्यातलीं नाव ठेवतात की, रोज उठून जर ही अस बोलते, तर तुम्ही तरी इतक का सोसून घेता !

**दिनकरपंत**—का सोसून घेता ! बोलून चालून भिकारी माणसें आपण ! पाहिजे कशाला येवढी ऐट !

**यमुनाबाई**—हो ! अस म्हटल म्हणजे झाल !

**दिनकरपंत**—मग आता करायचं काय त्याला ! लोक बोललीं–मीं म्हणतों वेळेनुसार लाथा जरी त्यानीं मारल्या–तरी त्या सोसल्या पाहिजेत आपल्याला ! सोशीकपणा, कोडगेपणा, अगदीं लोचटपणा दाखविल्याशिवाय आपल्याला खायला एक तुकडासुद्धा मिळायचा नाहीं ! हें पोट !– ( हुंदका देतो. )

**यमुनाबाई**—अगबाई ! हे काय बर अस ! ( जवळ जाते. )

**दिनकरपंत**—पगार मिळणार पंधरा रुपडे ! आणि गावात तर दहा आणे बारा आणे खणाखालीं जागा मिळत नाहीं. आणू कुठले ! (पुनः रडूं लागतो. )

**यमुनाबाई**—पुरे गडे ! आज हे काय आरंभलं आहे ! ( पदरानें डोळे पुसूं लागते.)

**दिनकरपंत**--बरें, दुसरे काहीं करीन म्हटले, तर रोज रात्रीं आठ आठ-नऊ नऊपर्यंतच्या कामानें खचून, अगदीं मेल्यासारखें होऊन जातें!

**यमुनाबाई**--आणखी कुठं नाहीं का जमण्यासारखं !

**दिनकरपंत**—कुठे आणखी ! होती सरकारी ती सुटली, अन् दुसरीचा हा असा नऊ नऊ वाजेपर्यंत ताप ! बरं, एखादी जागा रिकामी आहे असें कुठें कळायचा अवकाश, कीं, त्या एका जागेसाठीं दुष्काळानें खवखवलेलीं माझ्यासारखीं शभर कुत्री धापा टाकीत येतात ! त्यात पुनः वशिला ! खरोखर, या वशिल्याने तर माणसाला भडावून सोडले आहे ! प्रत्येक गोष्टींत-मला वाटते, ईश्वराच्या घरीं आपण चागला वशिला लावला नाही, म्हणून या दारिद्र्याच्या—हाडेन् हाडे पिळून काढणाऱ्या दारिद्र्याच्या पोटी-( पुनः रडू लागतो. )

**सखाराम**—( किंकाळून उठतो ) आई !

**यमुनाबाई**—गडे पुरे आता ! अस काय अगदीं पोरासोरासारखें ! ( सखारामाजवळ जाते ) सखाराम ! बाळ ! आतापर्यंत अमळ बरी झोप लागली होती. पुनः आणखी-

**दिनकरपंत**—( सखारामाजवळ जाऊन ) सखाराम !

**सखाराम**—( तापात बडबडतो ) मास्तर ... मास्तर मी तुमच्या पाया पडतो-नादारी द्या ! बाप माझा गरीब आहे हो ! ( पुनः किंचाळतो ) आई !

**दिनकरपंत**—हा ! हा ! हा ! डोकें कसें—

**सखाराम**—आई !-पाणी—

**दिनकरपंत**—तहानेन त्याचा जीव कासावीस होत आहे ग !

**यमुनाबाई**—पण पाणी कसं द्यायच त्याला ! हें दूध देतें म्हणजे झालं. सखाराम, हें दूध घे बाळ. ( त्याच्या तोंडाशीं वाटी धरते )

**सखाराम**—असेना फाटका कोट-मला चालतो. आई—

**यमुनाबाई**—बर, हें दूध घे आता. ( त्याच्या तोंडात दूध ओतते.)

**दिनकरपंत**—दूध तर अगदीं थोडें आहे ग ! येवढेसें हें दूध, रात्रभर त्याला कसें पुरणार ! थोडेसें जास्ती का नाहीं घेतलेंस !

**यमुनाबाई**—घेऊ कुठून ! पावशेरापुरतेच जर मजजवळ पैसे—

**दिनकरपंत**—( मनात ) पैसा !—

**सखाराम**—मी नाहीं खेळायला येत जा ! गाडीखालीं सांपडून मघाशींच एक मुलगा मेला ! अण्णा ! अण्णा ! बाजूला व्हा !

**यमुनाबाई**—अगबाई ! पाहिलं यानं कसे डोळे फिरवले ते ! मला बाई ! ( डोळ्याना पदर लावून रडूं लागते. )

**दिनकरपंत**—नको रडूंस ! आपण तरी काय करणार ! जें व्हायचें असेल तें—

**सखाराम**—आई ! पाणी !

**दिनकरपंत**—का उगीच त्याला तहानेन मारते आहेस ! पिऊ दे पाणी त्याला.

**यमुनाबाई**—नका हो-अस काय ! ( त्याच्या हातांतून भांडें हिसकावून घेते ) तुम्ही कीं नाहीं-आता मी राधाबाईकडे जाऊन दूध घेऊन येतें.

**दिनकरपंत**—बरं तर लवकर ये. पण हें बघ, त्या निजल्या असतील तर—

**सखाराम**—आई ! आई !

**यमुनाबाई**—आलें बरं बाळ ! ( हातात भांडें घेऊन जाते. )

**दिनकरपंत**—( क्षणभर दाराकडे पाहून आपल्याशीं ) यमुने ! या अभाग्याच्या घरांत पाऊल टाकण्यापूर्वी, विवाहस्थितीचीं जीं जीं म्हणून

गोड स्वप्ने आपल्या हृदयात साठविली होतीस, त्यातलें एक तरी खरे झाले आहे का! ( सखारामाच्या तोंडाकडे पहात रहातो. )

**सखाराम**—( बडबडत ) अहो, अहो! मला कामाला ठेवता का! आई!

**दिनकरपंत**—सखाराम! सारखी मान हलवतो आहे! तहानेनें याचा जीव तर अगदी कासावीस झाला आहे! ( पाण्याचें भांडे हातात घेतो )

**सखाराम**—आ . आ!

**दिनकरपंत**—पाजतोच हे पाणी काय हरकत आहे? पण, नको!

**सखाराम**—( आचके देतो ) आ . आई!

**दिनकरपंत**—अरेरेरे! काय बिचाऱ्याचे हाल होत आहेत हे! सखा! हे घे बाळ पाणी ( पाण्याचे भांडे मुलाच्या तोंडाशी नेतो ) काय! 'मुलाला मारू नकोस–पाणी पाजू नकोस!' म्हणून कोण ओरडले ते?

**सखाराम**—अण्णा!

**दिनकरपंत**—ओ बाळ! पाणी पाहिजे? ( पुनः भांडे तोंडाशीं नेतो ) पी! थोडे का? चांगले पोटभर पी!–ओरडा! लागेल तितके ओरडा!–मरतो आहे तर सुखाने तरी मरू द्या! का उगीच?– आणि पुनः जगून तरी काय करायचे आहे? (पाण्याचे भांडे बाजूला ठेवतो.) आता जरा अमळ त्याला–हो! मी तरा तेच म्हणतो, की, 'बापाने मरायच्या वेळेला पोटभर पाणीसुद्धा पाजले नाहीं!' असे म्हणून देवाजवळ हा रडणार तरी नाही! ( सखारामाच्या डोक्यावरून हात फिरवतो. )

**सखाराम**—( कण्हत ) अण्गा! आई! आ ई! आ (आचके देतो व प्राण सोडतो! )

**दिनकरपंत**—( घाबरून व गहिंवरून) सखा! सखाराम! ..यमुने! ( सखारामाच्या अंगावरून हात फिरवतो व नाडी पहातो.) सगळ्या जगाचाच थरकाप झाला आहे! सखाराम! (पुनः छातीला हात लावतो) जा! सुखाने जा! पुनः म्हणून मनुष्यजन्माला येऊ नकोस! हे दुर्दैवी प्राण्या! सुटलास या घोर नरकातून! ( रडू लागतो ) मी तुला आजपर्यंत काही

रागानें बोललो असेन, जें काहीं छळले असेल, त्याची-सखाराम!-मला क्षमा कर! (मुलाच्या हृदयावर डोके ठेवून अधिकच रडू लागतो!) कुणाच्या पाया पडून-सखाराम-आता नादारी मागू नकोस! 'कामाला ठेवता का?' असे म्हणून कोणाला आता विचारू नकोस! जा! बाळा! मागेसुद्धा वळून पाहू नकोस! नाहीतर या जगात-या घोर नरकात-कायम होण्यासाठी तुला उन्हात'न्हात भणभण भटकावे लागेल! ढसढसा रडावे लागेल! सखाराम! यमुने! (इतक्यात यमुनाबाई दूध घेऊन रडत रडत आत येते) नको ओरडूस! सुटला बरे आपला बाळ!-आता रडायचे असेल तर आनदाने!—

**यमुनाबाई**—हायरे बाळा! सखाराम! कसा रे मला टाकून गेलास! बाळा! (मुलाच्या अगावर पडून मोठमोठ्याने रडू लागते. त्र्यबक जागा होतो. आपल्या भावाच्या प्रेताकड-नतर आईकडे व बापाकडे कावऱ्याबावऱ्या नजरेनें पहातो. 'आई काय झाले? अण्णा! का रडता!' असें विचारू लागताच ती उभयता मोठमोठ्याने रडू लागतात.)

